






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.









अनुक्रमणिका

२८१७

संपादक - यशवंत दिनकर पेंढारकर

वर्ष २१ वे अंक १ला (८६) एप्रिल-जून १९८८
वर्ष २१ वे " २रा (८७) जुलै-सप्टेंबर १९८८
वर्ष २१ वे " ३रा (८८) ऑक्टोबर-डिसेंबर १९८८
वर्ष २१ वे " ४था (८९) जानेवारी-मार्च १९८९

अनुक्रमणिका



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका



वर्ष २१ वें : अंक ? ला

एप्रिल–जून १९४८




संपादक

अनुक्रमणिका



# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष २१ वें ] एप्रिल-जून १९४८ [ अंक १ ला

## नवें-जुनें

"नवीन कांही गा हो आता
जुनें-जुन्याचें चर्वण सरूं द्या
प्रतिभेचीं पांखरें आपुल्या
नव्या नभामधुनी भिरभिरूं द्या !
तीं कमलें तीं, त्याच चांदण्या
तेंच चांदणें, तोच सुधाकर
प्रेम तेंच तें, त्या नवयुवती
तीं कुसुमें अन् तो कुसुमाकर !
युगायुगांतुन घासत घोटत
टाकारित आकारित बसली
कविकलमांची अफाट सेना
काव्यमूर्ति त्या जीर्णामधली !"

"प्रिय रासिका, हें खरें तुझें वच
मीहि असें जीर्णाचा वैरी
परि कालाच्या अतीत आहे
अनाद्यन्त ही दौलत सारी !
प्रमदेच्या मधु अधरावरचें
ललित लालसर तें आमंत्रण,
चंद्र पुनेचा धरतीभंवती
करितो जी स्वप्नांची गुंफण,
वैशाखांतिल पहांटवेळीं
कूजन जें तिमिरांतुन वाहे,
सुगंध-सुंदरता सुमनांतिल
अथांगता जी गगनीं आहे;
सौंदर्यें हीं होतिल जेव्हां
नीरस आणि असुंदर सखया,
त्याच क्षणीं या संसारांतिल
कविता अवघी जाइल विलया !"

—कुसुमाग्रज



## गणेश-कवि-कृत
## “ शौरिसु (र) तरंगिणी ”

: लेखक :
विनायक वामन करंबेळकर,
एम्. ए.; साहित्याचार्य,
नागपूर विश्वविद्यालय, नागपूर.

नागपूर विश्वविद्यालयाच्या हस्तलिखितसंग्रहांतील क्रमांक ५८१ वें हस्तलिखित विशेष कुतूहल निर्माण करणारें आहे. हें हस्तलिखित कांही फार मोठें आहे असें म्हणतां येत नाही. आकार $८\frac{३}{४}'' \times ३\frac{३}{४}''$, पृष्ठसंख्या १३, प्रत्येक पृष्टाच्या प्रत्येक बाजूस जवळ जवळ १५ ओळी असलेलें, व जीर्ण अवस्था, बारीक व दुर्बोध हस्ताक्षर, मधून मधून व आजूबाजूस बऱ्याच दुरुस्त्या अशा स्वरूपाचें हें हस्तलिखित आहे. जाड व खरखरीत कागद, कोठे कोठे पुसट झालेली काळी शाई व इतर तदनुषंगिक गोष्टींवरून हें हस्तलिखित कमीत कमी दोन अडीचशें वर्षांपूर्वीचें असावें असा अंदाज बांधतां येतो.

प्रस्तुत हस्तलिखिताचें नांव “ शौरिसुरतरंगिणी ” किंवा “ शौरिसुतरंगिणी ” असें आहे. हें एक श्रृंगारप्रधान काव्य आहे. आपाततः हें काव्य संपूर्ण असावें असें दर्शविणारीं चिन्हें उपलब्ध आहेत. म्हणजे आरंभीं श्रीगणेशायनमः आलें असून शेवटीं समाप्ति दर्शक ७' ७' ७' अशा खुणा आल्या आहेत. प्रस्तुत हस्तलिखितांत या काव्याचे फक्त दोनच 'तरंग' आले आहेत. ज्या अर्थी हे तरंग मधलेच म्हणजे तिसरा आणि चौथा असे आहेत त्या अर्थी तत्पूर्वीचे व तदनंतरचे तरंग कवीने लिहिलेले असावेत. पण ते सध्यां तरी उपलब्ध नाहीत. तिसऱ्या तरंगाचें नांव “ अनंगरंग ” असें असून चौथ्यास “ सरसप्रदान ” असें अभिधान दिलेलें आहे.

या दोन तरंगाच्या शेवटीं जीं समारोपादाखल वाक्यें आलेलीं आहेत त्यांवरून प्रस्तुत काव्याच्या कवीबद्दल थोडीशी माहिती मिळूं शकते.

( अ ) “ इति श्रीमत्काशीस्थ माध्यंदिन माष्टयोपना ( ? ) सदाशिवोपाध्यायसुत गणेश-कवि-कृतौ शौरिसु ( र ) तरंगिण्यां...अनंगरंगोनामतृतीयस्तरंग : । ”

( आ ) “ इति श्रीसदाशिवोपाध्यायगणेशकविकृतौ शौरिसुतरंगिण्यां सरसप्रदानो नाम चतुर्थस्तरंग : । ”

या दोन समारोपांवरून शौरिसु ( र ) तरंगिणी काव्याचा कर्ता गणेश नामक कवि होता; तो सदाशिव उपाध्यायाचा मुलगा; माष्टि किंवा माष्टे आडनांवाचा; यजुर्वेदाच्या माध्यंदिन शाखेचा व काशीस राहणारा इतकी माहिती निष्पन्न होते. वास्तविक ही माहिती अगदीं अपुरी आहे. परंतु प्रस्तुत काव्यावरून तींत आणखी थोडी भर घालतां येण्यासारखी आहे. काव्य श्रीकृष्णविषयक असल्यामुळें कवि कृष्णभक्त होता असें ठरूं शकतें; काव्यांत चमकणारा कल्पनाविलास श्रीमद्भागवताची आठवण करून देतो. त्यावरून कवीचा वैष्णव पुराणांचा व्यासंग लक्षांत येतो व कवि काशीस पुराण सांगण्याचा व्यवसाय करीत होता अशी कल्पना करावीशी वाटते. काव्यांतील अनेक श्लोक कवीची रसिकता, साहित्य, छंद, अलंकार वगैरे शास्त्रांवरील त्याचें प्रभुत्व दर्शविणारे आहेत. शिवाय काव्यांत कवीने अनेक भाषा उपयोगांत आणल्या

आहेत त्यावरून कवि बहुभाषाभिज्ञ होता हें ठरतें. शौरिसु(र)तरंगिणीची मुख्य भाषा जरी मराठी असली तरी कवीनें मधून मधून हिंदी, संस्कृत, गुजराथी श्लोक, श्लोकार्ध किंवा चरण आणले आहेत. काव्याची भाषा शुद्ध मराठी आहे यावरून कवि महाराष्ट्रीय होता, परंतु ग्रंथाच्या निमित्ताने तो काशीस स्थायिक झाला होता. तेथेंच त्याने हिंदी भाषा प्राप्त करून घेतली. कवि संस्कृतज्ञ पंडित होता हें पुढें उध्दृत केलेल्या श्लोकावरून वाचकांच्या ध्यानांत येईलच. गणेश कवीने प्रस्तुत काव्याशिवाय आणखी कांही ग्रंथ लिहिले आहेत किंवा नाही हें समजावयास मार्ग नाही. याच काव्याचे गहाळ झालेले तरंग सांपडले तर कवीविषयीं व त्याच्या ग्रंथकर्तृत्वाविषयीं अधिक माहिती मिळणें शक्य होईल.

मला हें काव्य आढळल्यानंतर कवि व काव्य या दोहोंच्या अपरिचयामुळे मी त्यांच्याविषयीं अनेक तज्ज्ञांजवळ चौकशी केली. परंतु कोणालाच ' गणेश ' कवि व ' शौरिसु ( र ) तरंगिणी ' काव्य याबद्दल कांहीच माहिती नाही असें आढळून आलें. अद्यापि मी त्यांच्याबद्दल अधिक माहिती मिळविण्याच्या प्रयत्नांत आहे. प्रस्तुत काव्याचें नांव संस्कृत काव्यांच्या धर्तीवर आहे. परंतु " शौरिसु ( र ) तरंगिणी ' या सामासिक शब्दाचा कसाहि विग्रह केला तरी समाधानकारक अर्थ निघत नाही. शौरि ( श्रीकृष्ण ) – सुरत ( शृंगारक्रीडा )—रंगिणी असा किंवा शौरिसुत ( श्रीकृष्ण )–रंगिणी असा कसाहि विग्रह करून ' तरंगिणी ' असें पद वेगळें काढतां येत नाही व समासाचा समाधानकारक अर्थ लागत नाही. शेवटीं येणाऱ्या " रंगिणी " पदाचा काय अर्थ लावावा हा प्रश्न पडतो. काव्य श्रीकृष्णविषयक आहे एवढें म्हणून काव्याचें स्वरूप स्पष्ट होणार नाही. तें स्पष्ट होण्यासाठी त्यास श्रीकृष्णाला उद्देशून असलेलें विरहशृंगारप्रधान गोपीगीत असें म्हणावें लागेल. काव्यांत वंशस्थ, प्रहर्षिणी, वसंततिलका, मालिनी, पंचचामर, हारिणी, पृथ्वी, शिखरिणी, मंदाक्रांता, शार्दूलविक्रीडित, वगैरे वृत्तांचा उपयोग केला आहे. तिसऱ्या तरंगांत १०० श्लोक व चौथ्यांत ५८ श्लोक मिळून उपलब्ध काव्य १५८ श्लोकांचें आहे.*

## २ कवि कृष्णभक्त कीं रामभक्त ?

शौरिसु (र) तरंगिणी काव्याच्या उपलब्ध तरंगांतील १४८ श्लोकापर्यंत गणेश कवि कृष्णभक्त होता ही समजूत टिकते. कारण तोपर्यंत काव्य कृष्णवर्णनपर आहे. उ० चौथ्या तरंगांतील ४८ श्लोकः—

---

* तिसऱ्या तरंगाच्या ४६ व्या श्लोकानंतर –

हिमकर किरणाचा दाह देहास झाला । मदनकुसुमबाणें विंधिले या जिवाला ॥
प्रियतम सखि माझा दूर देशास गेला । तळमळित असे मी वायु कां मंद झाला ॥

हा श्लोक अधिक आला आहे. त्याचप्रमाणें त्याच तरंगाच्या ५९ व्या श्लोकानंतर–

मुकुंद कुंद मंदसा हळूच वेणु वाजवी
समीर धीरजा मदे फिरे न गाजवा जवी । ( ? )
तयास मोहुनी वनी वनीं फिरत नायिका
त्यजून रत्न गोकुला कुला [ हरि ] समीर नायिका ॥ [ ? ]

हा श्लोक अधिक आला आहे.

देवे माझ्याच बाई टपटप लिहिले वांकडे वर्ण भालीं
जालीती जाण जेणे निति उठुनि नव प्रेमजंजालजालीं ।
धन्या त्या गोपकन्या हरिविण रजनी कंठिती वा मुखानें
या जीवातें गमेना यदुवरचरणावांचुनी पान खाने ॥ ४-४८

व लगेच ४९ व्या श्लोकापासून—

सीतानाथसमान मानव जगीं झाला न होती पुढे
त्याला अन्य सुरांसमान म्हणती बोधाविहीने मुढे ।
वेदान्तव्यवसाय वंद्य गमतें विद्याव्रतां ब्रह्म जें
तें हें जाण विदेहराज नगरीं बोले गुरूसी गुजें ॥ ४-४९

शेवटपर्यंत ( श्लो. ५८ ) सर्वच श्लोक रामभक्तिपर आहेत. कृष्णवर्णनात्मक काव्यांत हा बदल अनपेक्षित वाटतो. कदाचित् कवि रामभक्त असावा, कदाचित् शौरिसु (र) तरंगिणी हें रामकृष्णवर्णनपर काव्य असणेंहि शक्य आहे. काव्याचा शेवटचा श्लोक—

कान्तारीं वामकामद्युति गति करिती कांडकोदंडधारी
मागे सीता रतीची प्रतिनिधि फिरते घेउनी नीर सारी ।
दोघांचीं धूतवस्त्रें धरुनि शरधनुःपाणि सौमित्रि चाले
तों तों ब्रह्मेन्द्रभर्गप्रमुख सुर म्हणे आमचे काम झाले ॥ ४-५८

कांही काव्यसमाप्तिदर्शक वाटत नाही. उलट कवि पुढच्या तरंगांत रामायणांतील एखादा कथाभाग वर्णनास हातीं घेणार असा आविर्भाव दिसतो. त्यावरून शौरिसु (र) तरंगिणी हें "द्व्याश्रय" काव्य असावें असा तर्क सयुक्तिक वाटतो. शिवाय कवीने ज्या पद्धतीने कृष्णवर्णन केलें आहे—

मोराचा मुकुट शिरीं करांत काठी
गुंजांचा गजर गळां पटांत गांठी ।
खांदा रे निब्रर नवीन कंबलाने
जाभेचा (?) यदुवर जीतशी बलाने ॥ ३-२६

त्याहून त्याची रामवर्णनाची पद्धति अगदीं वेगळी आहे.[1] हा फरकच कवि रामभक्त आहे हें सिद्ध करावयास पुरेसा आहे. त्याचप्रमाणें काव्यांत कवि कृष्णवर्णनाकडे विशेष लक्ष न देतां गोपींच्या विरहाला प्राधान्य देऊन त्याच्याच विविध छटा आस्थेने रंगविण्याचा प्रयत्न करतांना आढळतो. त्यामुळे श्रीकृष्ण नुसता काव्यनायक ठरतो. कवीने केलेलें कृष्णलीलावर्णन भागवतादि ग्रंथांच्या आधारें केलें आहे. त्याचप्रमाणे कवीने रामचंद्रप्रभूवर निर्माण झालेल्या बहुमूल्य ग्रंथांचा चांगला अभ्यास केला आहे, हें सोदाहरण दाखवून देतां येतेः—

वेदान्तव्यवसाय वंद्य गमतें विद्याव्रतां ब्रह्म जें
तें हें जाण विदेहराजनगरीं बोले गुरूसी गुजें ॥ ४-४९

या श्लोकार्धात 'योगवासिष्ठा'चा अप्रत्यक्ष निर्देश आहे. दुसरें उदाहरण तर अधिकच स्पष्ट आहेः—

१ पूर्वोद्धृत ४-४९ श्लोक पहा.

नोका नौकेस लाऊं चरण तरणिची धालितो आण रामा
पोष्यें पोषावया हें द्रविण पुरावेणें केवि संसार सामा ।
झाली येका शिलेची रमणि रघुपते येकली गौतमाला
काष्टें संख्याविहीने वधुमय करितां धाडि येते घराला ॥ ४–५१

या श्लोकाची 'अध्यात्मरामायणां'तील दोन श्लोकांशी[1] तुलना करतां कवीने तेथील कल्पना जशीची तशी उचलून घेतल्याचें स्पष्ट आढळून येतें. याप्रमाणें कवीने आपण निःसंशय रामभक्त असल्याचें, या काव्यांत अलेल्या स्रग्धरा वृत्तांतील शेवटच्या दहाच श्लोकांवरुन दाखवून दिलें आहे. बाकीचें काव्य (श्लोक १४८) गोपी–कृष्णांच्या परस्पर विरहाचें गोपीकृत वर्णन आहे.

**(३) काव्यरचनाः—**

कवीने प्रस्तुत काव्य कांही विशिष्ट योजना मनांत धरून लिहिलें आहे असें वाटत नाही. कविप्रतिभेला जसजशा कल्पना स्फुरत गेल्या तसतशा त्या वृत्तबद्ध करण्यांत आल्या असाव्यात. जर पूर्वनियोजित योजकता कोठे असलीच तर ती वाढत्या अक्षरांचे छंद एकामागून एक उपयोगांत आणण्यांत आहे. प्रथम स्वागता, नंतर प्रहर्षिणी, वसंततिलका, मालिनी, पंचचामर, हरिणी, पृथ्वी, शिखरिणी, मन्दाक्रान्ता, चर्वरी, मंजरि, शार्दूलविक्रीडित व स्रग्धरा असा क्रमाक्रमाने अक्षरगणवृत्तांचा उपयोग पूर्वयोजनेला धरूनच दिसतो. वृत्तानुरोधाने काव्याची विभागणी केली तर—स्वागता १५; प्रहर्षिणी—१६ ते ३३; वसंततिलका—३४ ते ४३; मालिनी—४४ ते ५३; पंचचामर ५४ ते ६०; हरिणी—६१ ते ६४; पृथ्वी—६५ ते ८२; शिखरिणी—८२ ते १०० (तरंग तिसरा पूर्ण); शिखरिणी—१ ते ३; मंदाक्रान्ता–४ ते १३;चर्वरी– १४; मंजरि—१५; शार्दूलविक्रीडित—१६ ते ४१; स्रग्धरा—४२ ते ५८ (तरंग चौथा पूर्ण) अशी होईल. वरील वृत्तांत कवीला एखादें वृत्त विशेष प्रिय आहे असें ठरविण्यास कांहीच साधन नाही. रसोपकार म्हणून अमुक स्थळीं कवीने अमुक वृत्त वापरलें आहे असेंहि म्हणावयास जागा नाही. कारण स्थायि विप्रलंभ शृंगार अथपासून इतिपर्यंत कायम आहे.

प्रस्तुत काव्याचा दुसरा विशेष म्हणजे त्यांत संस्कृत नाट्यशास्त्राने किंवा काव्यशास्त्राने जे नायिकांचे भेद केले आहेत त्यांचीं उदाहरणें देण्याचा प्रयत्न केला आहे. त्याच प्रमाणें विप्रलंभ श्रृंगाराच्या ज्या विशिष्ट दशा किंवा अवस्था वर्णिल्या आहेत त्यांचीहि उदाहरणें देण्याचा प्रयत्न आहे. या प्रयत्नांत काव्याला कृत्रिमपणा आला असें मात्र म्हणतां येत नाही. आरंभापासून काव्याचा ओघ अनिर्बंध वाटतो. प्रश्न फक्त आरंभाचाच आहे. मागील तरंग उपलब्ध नसल्यामुळे काव्याची सुरवात कसल्याहि पार्श्वभूमिशिवाय एकाएकीं झाल्यासारखी वाटतेः—

"स्मर आकला जड कलाधर झाला
प्रिय रूसला विसरला वचनाला,

---

१ क्षालयामि तव पादपङ्कजं । नाथ ! दारुदषदोःकिमन्तरम् ।
मानुषीकरणचूर्णमस्ति ते । पादयोरिति कथा प्रथीयसी ॥
पादाम्बुजं ते विमलं हि कृत्वा । पश्चात्परंतीरमहं नयामि ।
नो चेत्तरी सद्युवती मलेन । स्याच्चेद्विभो विद्धि कुटुम्बहानिः ॥

उर दाटला श्रम फलास न आला
जिव जाचला सखि चला सदनाला" ३-१

या श्लोकाने काव्याची सुरुवात झाली आहे. नंतर अशाच प्रकारचे श्लोक एकामागून एक येऊं लागतात.

**(४) नायिका**– काव्यांतील स्थायि विप्रलंभ श्रृंगार असल्यामुळे कवीस मुग्धा, मध्या, प्रगल्भा, धीरा, अधीरा, स्वाधीनभर्तृका, खण्डिता, अभिसारिका, कलहान्तरिता, विप्रलब्धा, प्रोषितभर्तृका, वासकसज्जा, विरहोत्कंठिता वगैरे सर्व दृष्टींनी आपली किंवा आपल्या नायिका वर्णितां आल्या आहेत. काव्यांतील नायिका कोणी तरी एक किंवा अनेक गोपी आहेत.पण त्यांत राधा नायिका आहे किंवा नाही हें निश्चित सांगतां येत नाही. राधेचा उल्लेख मात्र

कनक रुचिर **राधा** आपनी कान्हकाला
हरि तरि विनवा हो दृष्टिधाका न घाला ।
घन घन चहुं कोणी धीर कोण्ही धरीना
तरिच सखि शठाचा नित्य वाटे करीना ॥ ३-५२
त्याथी हो निपट नथी कहो गुसाथी
पूछोंगी फिर वतिया सबाह साथी ।
सूधी हे बालि **वृषभानु की कुमारी**
जाती हो हरि पति राखिये हमारी ॥ ३-३०
**राधा** बाधा तुजविण वनी वाहते मन्मथाची
गोरी गोडी हृदयिं धरिते जाण तूझ्या कथाची ।
प्रेमा वामा करुनि कपटें मांडलें वैर तीशीं
कामा कामासम पुरावेणें भेटुनी भूरतीशी ॥ ४-७
**राधाकृष्ण** परस्पर प्रियपणे दूऱ्हूनिया पाहती
येकांता मग जाणुनी स्मरमदें हांसूनिया बाहती ।
रोमांच व्यवहार देखुनि सुखें येऊनियां भेटती
देतीं चुंबन ये रिती करुनियां संभोग संभोगिती ॥ ४-१६

या श्लोकांत राधेचा त्रयस्थ नात्याने उल्लेख करून सहानुभूतीने इतर काव्यनायिका तिचा विचार करतात व तिच्या रतीचे वियोग व संयोग अशा दोन्ही प्रकारें वर्णन करतात. यावरूनच राधा प्रस्तुत काव्यांत नायिका नाही हें निश्चित ठरतें. काव्यनायिका एक की अनेक हें जरी निश्चित नसलें तरी ती परकीया आहे:—

करिती करोत नगरीं नर निंदा
धरिती धरोत पदरीं परि (पर) निंदा ।
मज आश एक नृपनंद मुलाची
मन लागलें विफल लाज कुलाची ॥ ३-९
नंदाचा सखि सुत हा कसाक आहे
दानाला कर धरितां गदाद वाहे (१.)।
आम्ही त्या पुरवनिता नको कलूं दे
पाहातां पति म्हणसी मला पलूं दे ॥ ३-२१

तिच्याविषयीं समजणारी दुसरी निश्चित गोष्ट म्हणजे ती एक व्रजांतील गोपी आहेः—

नंदाच्या प्रथम चला घरास जाऊं
त्यापुढें हरिकृत हा हवाल गाऊं ।
कंसाला जुलुम जगाति जाणवावी
थोराची मग इजती व्रजांत घ्यावी ॥ ३–२२

प्रस्तुत काव्यांतील नायिका श्रीकृष्णाला चांगली ओळखणारी म्हणजे त्याला इतर नायिका आहेत हें जाणणारी आहे. इतकेंच नव्हे तर त्या इतर नायिकांबद्दल तिला सहानुभूति आहे. त्यांच्या विरहदुःखात तीहि सहभागी बनते. आपल्या त्या सखींना समजुतीच्या गोष्टी सांगते. राधेबद्दल ही काव्यनायिका पुढील उद्गार काढतेः—

हिमकर किरणाने पोळतां दीनवाणी
हरि हरि हरिणाक्षी कंठिते* दीन वाणी ।
नख शिख शिखराने विं(धि)तो कामराणा
प्रिय पिक बहुमाने विंधितो कां पराना ? ३–५३

दुसऱ्या एका आपल्यासारख्या विरहदुःखानें पिडलेल्या सखीला पुढील प्रमाणे उपदेश करतेः—

प्रतिपद नवे नेमे होती मनोरथ ( मा )नसीं ।
विसर करिसी बाले बोला न कानि न मानसी ॥
पिक कटु रटे लीलाकुंजा न धीर मला धरे ।
परतुन न ये गेला काल प्रवालदलाधरे ॥ ३–६१

व इतर सर्व गोपींच्या वतीने श्रीकृष्णाला प्रार्थना करतेः—

तुजविण वनीं आम्हा शोभा न ये यदुनंदना
म्हणुनि रचितों आम्ही तूझी सदा पदवंदना ।
पसरुनि तुला बोटी आतां मिळून अकिंचना
विनति करितों दीनांची तूं नको करुं वंचना ॥ ३–६४

कवीने आपल्या नायिकेचें किंवा नायिकांचें संस्कृत रसशास्त्राधारें जें वर्णन केलें आहे त्यांत स्थायि विप्रलंभास उचित अशा अधीरा, खंडिता, अभिसारिका, विरहोत्कंठिता, वासकसज्जा यांच्या वर्णनास विशेष अवसर मिळाला आहे. सर्वत्र नायिका **प्रगल्भा** आहेः—

उघडा कवाड जरि चाड चिरीची
प्रियवीण चारु चुनडी न जरीची ।
उतरा धरा कर करें रमणाचा
पुरवा मनोरथ मुरारि मनाचा ॥ ३ –४

त्यांत **विरहोत्कंठिताः**—

जोडून हात हरि हाजिर हा न राहे ।
देवाशि हे न दिधली मति कां न राहे ॥
आलें निशाण शशिशाण मनोभवाचें
बोलून काय निजजीवन लोभ वाचे ?॥ ३–३७

* काय ते.

किंवा **वासकसज्जाः**—

शिंपीते सुरभि जलें धरा पहा ते
पर्यंकीं बसुनि पयोधरा पहाते ।
वोंवीते हरि तरुणी गुलाब हातें
तूं येसी म्हणुनि शिरीं फुला वहाते ॥ ३-१७

किंवा **प्रोषितभर्तृकाः**—

प्रियतम नसे गावीं, जावे कसें रतिमंदिरा
सजणि रजनी वारा, वारा सचंदन चंदिरा ।
शिव शिव गमे वाणी कानीं नको किलकोकिला
अलस मजला वाटे, वाटे करा हरिच्या मला ॥ ३-६२

वगैरे विशिष्ट अवस्था दर्शवून कवीने अथ पासून इतिपर्यंत आपली नायिका प्रौढा, अधीरा व प्रगल्भा कायम ठेवली आहे.

**(५) रसविचार**—

काव्याचा स्थायि विप्रलंभ शृंगार आहे हें मागें सांगितलेंच आहे. त्या रसाचा परिपोष करण्यासाठी कवीने आवश्यक विभाव, अनुभाव, संचारी भावांची सामग्री मोठ्या कौशल्याने रचली आहे. आलंबन विभावांत श्रीकृष्ण नायक काव्यशास्त्राप्रमाणे "दक्षिण" नायक आहे.* व नायिका– एक किंवा अनेक वर दर्शविल्याप्रमाणें आहेत. उद्दीपन विभावांत—

घन दाटती गगन शब्द घनाचे
उरिं लागती सजणि घाय घनाचे ।
मन धाकतें चपल तें चपलाने
प्रियधीण जीवन पलेलं पलाने ॥ ३-५
झाला रसाल रमणीय नवा पिकांही
होतीं विलक्ष(ण) वनें मधुवापिकांहीं ।
आरंभिला सजणि घोर वृथा पिकांहीं
येना दया प्रियतमास तथापि कांहीं ॥ ३-३४
शशांक कर तोडवा मसृण मारतां कोडवा
मनोज मद मोडवा मलय आडवा पाडवा ।
पिकप्रकर ऊडवा सजणि चांदणे झाडवा
विषें विषम आडवा रमणवाघ (?) धाडवा ॥ ३-६७

वसंत ऋतु, उद्यानें, पुष्पसुगंध, मलयमारुत, मेघमाला, पिकप्रकार वगैरे सर्व उद्दीपक गोष्टी प्रस्तुत काव्यांत ठायीं ठायीं आलेल्या आहेत. त्या शिवाय अष्ट सात्विक भाव व तेहेत्तीस व्यभिचारि भाव देखील कवीने यथास्थित वर्णिले आहेत. उ. **स्मृतीचें** वर्णन पहा:-

भयें चिकुर सांवरी वदन कां वरी पाहते
करें वसन आंवरी श्वसनमाधुरी वाहते ।

* 'एषु त्वनेकमहिलासमरागो 'दक्षिणः कथितः ।' साहित्यदर्पण ३-३५

श्रमाम्बुकणकुसरी कुचगिरी शिरीं भासते
विदा हरिसमागता हलुच माधुरी हांसते ॥ ३-७२

किंवा औत्सुक्यः—

करीं कर पदीं पदा जघन जंघ जोडूनियां
उरीं उर भुजीं भुजा मुख मुखास लाऊनियां ।
करूनि भरि अंक मी हरुनिया हठें कंचुकी
कई सगुणसांवली धरिन पोटिशी मंचकीं ॥ ३-८१

किंवा शेवटीं उत्पन्न होणारा निर्वेदः—

घडी घडि पुढें पुढें नृपनटासवे वागलों
उपाय करितां रिता क्षुधित सर्वदा जागलों ।
धरून यदुनंदना विषयवासना भागलों
तुझ्या पतितपावना म्हणुनि दावना लागलों ॥ ३-८२

या व अशाच प्रकारच्या क्षणोक्षणीं बदलणाऱ्या भावनांचा हृदयंगम संगम घडवून कवीने विरहशृंगाराचें स्वरूप बहारीचें करून टाकलें आहे. माधुर्य आणि प्रसाद या दोन गुणांमुळे कवीची भाषा नैसर्गिकपणें रसोपकारक झाली आहे. क्वचित् दुर्बोधत्व आढळतें, पण तें हस्तलिखित बरोबर लागत नसल्यामुळे आलें असावें. याच काव्याचें दुसरें हस्तलिखित आढळलें तर हाहि दोष निवून जाईल अशी आशा आहे.

**(६) कवीचें अलंकारप्रियत्वः—**

गणेश कवीने अलंकारांच्या बाबतींत मराठी काव्याच्या रीतिकाळांतील पंडित कवींचें अनुकरण केलेलें आहे. भाषेची धाटणी सुरेख असावी, शब्दरचना अनुप्रासयुक्त लयदार असावी, अधून मधून अर्थालंकार चमकावे या काव्यगुणांत गणेश कवीची कविता वामन पंडित, मोरोपंत, सामराज, नागेश वगैरे कवींच्या कवितेसारखी आहे. प्रस्तुत काव्यांतील प्रत्येक श्लोकांत कवीने शब्दलालित्य साधण्याचा प्रयत्न केला आहे. पूर्वी उद्धृत केलेल्या श्लोकांवरून वाचकांना गणेश कवीच्या अनुप्रासाची व शब्दसौष्ठव साधण्याची आवड जाणवली असेलच. तरी देखील एक दोन उदाहरणें दिलीं तर तीं अधिक होणार नाहीतः—

उभा वेलोवेला सजणि सजणीला विनवितो
विडे देतां देतां वदन वदनाला भिलवितो ।
पुढें जातां जातां धरुनि पदराला फिरवितो
अश्या रीतीं प्रीती करुनि तरुणीला रिझवितो ॥
निकुंजीं कुंजाही शयन सुधरे घालुनि हरी
पराधीन प्रेमें मधुर मुरलीनें मन हरी ।
उभा येके पायीं सजणि तुजसाठीं तप करी
वनीं वागे जैसा कृपण करिणीवांचुनि करी ॥ ३-८३।८४

अर्थालंकार देखील प्रस्तुत काव्यांत भरपूर आहेतः—

वरि शोभते अधरि लेख पिकाची
सखि जीतते वचनरीति पिकाची ।

कमला न ये सरि सये वदनाची
रतिपूतली मति हरी मदनाची ॥ ३—३
"आलें निशाण शशिशाण मनोभवाचें" ३—३७
"रचूनि जरि अंजली तुजपुढें उभा राहतो
मुखेन्दु कचकैतवें निपट झांकि तो राहु तो ॥३—६६
"वनीं वागे जैसा कृपण करिणीवांचुनि करी ॥ ३—८४
"व्योमव्यक्त सरोवरीं उगवलें हें कंज नोहे शशी
शोभे हे पदपंक्ति साजणि नसे हा रंकु त्रिंबापशीं ।
शीतश्वेतमरंद बिंदु पसरे कोठील रे चांदनी
पाहे पीन परागमीलित नदी श्री हे न ते यामिनी ॥

वगैरे किती तरी उपमा, उत्प्रेक्षा, अपन्हुति, रूपकादि अर्थालंकाराचीं उदाहरणें प्रस्तुत काव्यांतून देतां येतात. 'पयोधर', 'कृष्णभुजंग' वगैरे श्लेष कवीला फार प्रिय आहेत, कारण त्यांचा प्रयोग वारंवार येतो. अर्थान्तरन्यासांत तर कवि सिद्धहस्त आहेः—

'ते पावती सखि दगा करिती दगा जे"॥ ३—३९
'परतुन न ये गेला काल प्रवालदलाधरे"॥ ३—६१
'निरालंबा रामा पुरुष बहुरामा हरि सदा ॥" ३—९०
'भुजंगा भूता (वा) समज जपला मंत्र न लगे ॥" ३—९२
'होती होट न चाटिल्या मन समाधानें भुकेल्या जना"॥ ४—२९

अशा रीतीने काव्यांतील नुसते अलंकार जरी निवडत बसलें तरी हा परिचयलेख प्रमाणाबाहेर लांबेल. म्हणून त्या भानगडींत न पडतां कवीचा विशेष म्हणून एवढेंच सांगावेसें वाटतें की, गणेश कवीचा उत्प्रेक्षेवरून अपन्हुतीकडे जाण्याचा कल विशेष आहे. नुसती उपमा तो कधीच वापरत नाही.

**(७) करम्भक काव्यः—**

विश्वनाथाने साहित्यदर्पणांत* अनेक भाषामय काव्य म्हणजे करंभक असें म्हटलें आहे. प्रस्तुत काव्य देखील करंभक काव्य आहे. त्याची प्रमुख भाषा जरी मराठी आहे तरी त्यांत मधून मधून हिंदी, संस्कृत, गुजराथी भाषेंत लिहिलेले श्लोक किंवा लोकार्ध आले आहेत. उपलब्ध शौरिसु (र) तरंगिणींत कमीत कमी पंचवीस श्लोक हिंदी भाषेंत आहेतः—

कहु क्यां किया मज गुणाह पियारे
मुजको बिनाहक खराब कियारे ।
[ बत न क्रमो गुणवतामुचितोऽयं
किमशोषयत्युपवनीवनतोयम् (?) ]
इन चंद ने कहर फंद किया है ॥
दिल तू ददोति करिबंद किया है ॥
मरि जिंद सोति धरबंद करोंगी ।
गल नंदबाल बिनबंध मरोंगी ॥

---

* "करम्भकं तु भाषाभिर्विविधाभिर्विनिर्मितम्" ।

अशा प्रकारचे संमिश्र भाषामय श्लोक या काव्यांत सर्वत्र विखुरले आहेत. त्या मानाने संस्कृत चरण कमी व गुजराथी चरण तर एखादाच आढळतो. गणेश कवीने हिंदी भाषेत श्लोकरचना केली आहे व मराठी काव्यांत देखील हिंदी शब्दांचा प्राचुर्याने उपयोग केला आहे. त्यामुळें एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. कवि काशीकडे राहणारा होता, तेथे त्याने स्थानिक हिंदी आत्मसात् केली हें जरी खरें असलें व मराठी काव्याच्या रीतिकाळांतील सर्वच पंडित कवींनी थोड्याबहुत प्रमाणांत हिंदी शब्दांचा उपयोग आपापल्या काव्यांतून केला हेंहि जरी मान्य असलें तरी प्रस्तुत काव्यांत जी हिंदी आहे ती जुन्या तऱ्हेची "व्रजभाषा" आहे. या भाषेला परंपरा आहे. कृष्णविषयक काव्याला हीच भाषा घ्यावयाची असा हिंदी वाङ्मयाचा संकेत आहे. गणेश कवीने देखील कृष्णविषयक काव्य रचलें व त्यांत हिंदी वाङ्मयसंकेताप्रमाणे व्रजभाषा वापरली आहे. त्यावरून त्याने सूरदासप्रभृति 'अष्टछाप' कवींपासून आपल्या काव्याला आवश्यक सामग्री घेतली असावी याबद्दल संशय उरत नाही. अष्टछाप कवींचें कृष्णकाव्य अगणित आहे. त्यांतून कोणत्या व्रजभाषाकवींचें गणेशानें अनुकरण केलें हा एक प्रश्न. या प्रश्नावरून कवीचा काळ ठरविण्यास बरीच मदत होण्याचा संभव आहे.

गणेश कवीचें संस्कृत प्रसंगविशेषीं घोंटाळ्याचें वाटतें. कोठें मराठीला जोडून तर कोठें **हिंदीला** जोडून संस्कृतचे प्रयोग झालेले असल्यामुळे त्यांत शुद्धाशुद्धतेकडे फारसें लक्ष पोहोंचलें नाही.

> **जानीजे किंमु न जडे** जिमी हमारी
> भूपाला भुजगभुजे जगाति प्यारी ॥ ३–२३
> आणावा धरुन घरास गोप बाई
> मेरा तो दिल हरि ले गया कहांई ।
> **पद्मिन्यास्तनममृते** गती न जाणे
> हय्यानू किम कहिये हलीं बिजाने ॥ ३–२८
> लावीतसें झडझडा झडि मेघमाला
> **दुःखानि वर्षति विधे किमु मेघमाला**
> देखे विना दुज कहां जिय जीय मेरे
> कीजे बनाव पिय नाव धुजी न मेरे ॥ ३–४०
> हिम हिम रजनीचे सोसणे माय कोणे
> कछुक हर किया है कान्हके सायकोणे ।
> **हृदयममृतधामा हन्ति वामांशुना मे**
> तुजविण दुख देती आणखी साधुनामे ॥ ३–४६

अशा पद्धतीचीं आणखीहि उदाहरणें देतां येण्यासारखीं आहेत. परंतु त्यांत आढळणारा एक विशेष असा आहे कीं, कवीनें मराठींत व हिंदींत जसे संपूर्ण श्लोक रचले आहेत तसे संपूर्ण संस्कृत श्लोक रचलेले नाहीत.

(८) **कवीची भाषाः**— कवीची मराठी जुन्या थाटाची आहे. अर्थात् ती किती जुनी आहे हें ठरविणें तज्ज्ञांचें कार्य आहे. कवीच्या मराठी भाषेवर अनेक परिचित व अपरिचित संस्कार झालेले दिसतात. 'ळ' बद्दल 'ल' व 'न' बद्दल 'ण' वर्णाचा प्रयोग

प्राचीन पंडित कवींची आठवण करून देणारा आहे. कवीच्या भाषेवर जर बलवत्तर प्रभाव कोणता पडला असेल तर तो हिंदीचा. प्रस्तुत काव्याच्या प्रत्येक मराठी श्लोकांत एखादा तरी हिंदी शब्द आढळतोच. 'जालिम,' 'सुन,' 'कान्ह,' 'दुनि,' 'गरीब,' 'इजती,' 'हाल,' 'ताजगी,' 'खत,' 'गवार,' 'हाजिर,' 'हक,' 'दगा,' 'खून,' 'गुमान,' वगैरे परकी शब्द कवीने सहज मराठींत मिसळून टाकले आहेत. या बाबतींत इतर पंडित कवींपेक्षां गणेश कवि जास्त पुढें गेलेला आहे. 'बोवीत,' 'कोन्हाला,' 'दून्डून,' वगैरे रूपें कवीचा काळ ठरविण्यास मदत करणारीं आहेत. 'जीततें,' 'कवाड,' 'चुनडीं,' 'लाजरा,' 'उजागर,' 'कसाक,' हे शब्द नागपुरी आहेत. त्यामुळें कवि मूळचा नागपूर कडला असावा अशी शंका येते.

अशा प्रकारचें 'शौरिसु (र) तरंगिणी' हें एक चमत्कारजनक काव्य आहे. तूर्त जरी तें अपूर्ण अवस्थेंत आढळत असलें तरी थोडक्या काळांत तें संपूर्ण आढळेल अशी आशा आहे. असें हें काव्य जर प्रसिद्धीस आलें तर तें खचित महाराष्ट्रिय जनतेस आनंददायक ठरेल. प्रत्यक्ष गणेश कवीनें स्वतःच्या काव्याबद्दल पुढील सूचक श्लोक लिहून ठेवला आहे.

साहित्यानें सगुणरमणीरंजनें जाण त्याहीं
शृंगाराचें सदन मदनोन्मत्त जें जाणत्याहीं ।
सायंकालीं शशिशित शिला पीठपृष्ठें चढावीं
गंगातीरीं मुरहरहर प्रेमपद्यें चढावीं.

या एकाच श्लोकांत 'शौरिसु (र) तरंगिणीच्या कवीचें वास्तव्यस्थान, त्याच्या काव्याचा विषय, त्यांतील रस, त्याचें उद्दिष्ट वगैरे सर्व गोष्टी आल्या आहेत. असें हें आज अज्ञात असलेलें काव्य लवकरच रसिक जनतेपुढें येऊन त्यांच्या आदरास पात्र होवो अशी इच्छा प्रकट करून हा परिचय लेख संपवितों.

---

## साभार स्वीकार--

**ईश्वरचंद्र विद्यासागर व इतिहासाचार्य राजवाडे**—ले० साने गुरुजी. प्रत्येकीं दीड रु.

**मोत्यांचा चारा**—( लघुकथासंग्रह )—ले० ग. ल. ठोकळ, किं. सव्वा दोन रु.

**साहित्य दर्शन**—ले० सरोजिनी बाबर व प्रा. वि. म. कुलकर्णी. किं. चार रु.

**आजच्या गोष्टी**—( भाग १ ते ३ ) —ले० के. नारखेडे. किं. आठ आणे प्रत्येकीं.

पहिलीं दोन पुस्तकें पुनर्मुद्रणें आहेत. आजच्या गोष्टी जाणत्या मुलांसाठीं लिहिलेल्या दिसतात. जगदीशचंद्र बोस, सुभाषचंद्र, ज्योतिराव फुले, म. गांधी, पंडित नेहरू वगैरे सद्यःकालीन राजकारणी, ज्ञानी, व समाजसुधारक थोर पुरुषांच्या जीवितांतील कांहीं प्रसंग गोष्टीरूपानें सांगितले आहेत. समरसता व नाट्यात्मकता ह्यांनीं गोष्टींस चांगली रंगत आली आहे. [ प्र० द. र. कोपर्डेकर, श्री लेखनवाचन भांडार, गणपती चौक, लक्ष्मीरोड, पुणें-२ ]

## वनस्पतींचें नामकरण :

ले०—डॉ. मल्हार विनायक आपटे,
कैवल्यधाम, लोणावळे.

पत्रिकेच्या १९४७ डिसेंबरच्या अंकांत डॉ. रघुवीर यांचा ' वनस्पतींची भारतीय नामकरण पद्धति ' या नांवाचा एक लेख ( डॉ. कर्वे यांनीं केलेला अनुवाद म्हणून ) आला आहे. त्यासंबंधीं दोन शब्द लिहीत आहें, त्याचा विद्वानानी विचार करावा. रघुवीरांच्या लेखांत ' नामकरण ' पद्धति अशी काहीच वर्णिलेली नाही. आयुर्वेदवाङ्मयांत एक हजार वनस्पतींचीं नावें आढळतात. तींच वापरावींत, असें सांगून कुलनामें साधावयाचीं तीं कुलप्रतीक असलेल्या जातीच्या नावापुढें कुल शब्द जोडून साधावीं असें म्हटलें आहे. यांत विशेष कांहीच नाही. वनस्पतीचीं नावें म्हणजे त्यांच्या जातींचीं नांवें असाच अर्थ होतो. तीं नांवें नवीन कशीं तयार करावीं म्हणजे शास्त्रीय वर्गीकरण पद्धतींत तीं कशीं बसतील, हेंच सांगावयास पाहिजे. आयुर्वेदवाङ्मयांत हजार जाती वर्णिलेल्या आहेत. पण आज लाखाच्या वर जाती शास्त्रज्ञांना माहीत आहेत. त्यांना पाश्चात्यांनीं नांवें दिलेलीं आहेत आणि तीं नांवें देण्याची त्यांची एक विशिष्ट पद्धतहि आहे, ती अशी. जातीजातींच्या सादृश्यावरून त्यांचे सोईस्कर गट करावयाचे. ( या गटास गोत्र म्हणूं. ) म्हणजे प्रथम गोत्रनाम ठरवावयाचें नि मग गोत्रनामापुढें त्या त्या जातीच्या विशिष्ट वर्णनाचा किंवा खुणेचा एक शब्द जोडावयाचा. असे दुहेरी नांव होईल तें संपूर्ण जातिनाम समजावयाचें. उदा० फणस, फणसुला, लकुच आणि भाकरीचें झाड, या चार जाती एका गोत्रांत मोडतात. त्या गोत्राचें नांव आर्टोकार्पस. याचा अर्थ दाट, घट्ट, दडस फळ असणारें झाड असा आहे.

यावरून जातिनामें अशीः—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ आर्टोकार्पस इंटेग्रिफोलिया | = | फणस | = | घनफली संपूर्णपर्ण | |
| २ आर्टोकार्पस हिर्सुटा | = | फणसुला | = | घनफली लोमयुक्त | |
| ३ आर्टोकार्पस लकुच | = | लकुच | = | घनफली लकुच | |
| ४ आर्टोकार्पस इन्सिसा | = | भाकरझाड | = | घनफली खंडपर्ण. | |

ही पाश्चात्य नामकरण पद्धति आहे. तिजपासून वेगळी एखादी भारतीय पद्धत आहे काय ? रघुवीरांनी कांही सांगितली नाही. जुन्या वाङ्मयांत उद्भिद–जीवनाचा निरपेक्ष विचारच नाहीं. मानवोपयोगी म्हणून विचार आहे. त्यांत अशा शास्त्रीय नामकरणाचा प्रसंग उद्भवला नाहीं. सामान्य लौकिक व्यवहारांत जशीं नावें पडत गेलीं तशीं गेलीं. ग्रंथकारांनी त्यांचा संग्रह केला आणि उपयुक्ततेच्या दृष्टीने वर्गीकरण करून कांही ठाकठिकी केली. मानवोपयोगाची दृष्टी सोडून स्वयंसिध्द उद्भिदाचें जीवन या स्वतंत्र दृष्टीने वर्गीकरण आज शास्त्रज्ञांना पाहिजे असून तें व्यक्त करणाऱ्या नांवांची त्यांना गरज आहे. ती भागवण्याची पध्दत पाश्चात्यांनी वर्तविलेली आहे. त्याहून वेगळी कांही पद्धत आपणांस पाहिजे आहे काय ? नको असे या प्रश्नाचं स्वाभाविक उत्तर आहे. पद्धत निराळी नको असली तरी भाषा भारतीय पाहिजे आहे काय ? असा दुसरा प्रश्न उद्भवतो. त्याचें उत्तर पाहिजे आहे असेंच येतें. रघुवीरांनी तेंच दिलें आहे. परंतु पुढें उदाहरणें देतांना जातिनामें नवीन कशीं करावीं किंवा कोणतीं वापरावीं हें न सांगतां असलेल्या जातिनामांवरून कुलनामें तयार करून दिलीं आहेत. कुलनामें जातिनामांवर

अवलंबून ठेवलीं म्हणजे अगोदर जातिनामें माहीत पाहिजेत. आणि त्यांत जितकीं कुलें तितकींच कुलनामें तयार होणार हें उघड आहे. आयुर्वेद-वाङ्मयांत हजार जाती उल्लेखिल्या आहेत; पण आज लाख जाती माहीत आहेत. त्यांची व्यवस्था काय करावयाची ? हा प्रश्न शिल्लकच राहतो.

डॉ. देसाई यांनीं १९२७ त औषधिसंग्रह म्हणून एक पुस्तक लिहिलें आहे. त्यांत ९५५ जातिनामें आहेत. इतक्या जाती ६१८ **गोत्रांत** आणि सुमारें १५० **गणांत** विभागल्या आहेत. देसाई यांनीं कुळाच्या ऐवजी वर्ग शब्द वापरला आहे इतकाच फरक. इंग्रजींत फॅमिली म्हणतात म्हणून रघुवीरांनी कुल म्हटलें आहे असें दिसतें. सदृश आणि आनुवंशिक संबंधीयांचा समुदाय असा त्याचा अर्थ आहे. आपण त्यास तूर्त **गण** असें म्हणूं. असे गण आज केवळ द्विदलामध्येंच सुमारे तीनशें आहेत. एकमेकाशी आनुवंशिक संबंध असलेल्या गणांचे पुनः आणखी गट करण्याची रीत आहे. अशा गटास **प्रगण** म्हणावें. असे प्रगण एकदल व द्विदल दोनही सपुष्प उद्भिदें मिळून एकूण ५१ आहेत. त्यांना नॅचरल ऑर्डर्स म्हणतात. डॉ. देसाई यांनी गणांनाच N. O. म्हटलें आहे. रघुवीरांनी जीं ३७ कुलनामें ( = गणनामें ) दिलीं आहेत त्यांतील पहिलें नांव सुदर्शन हें आहे. "हें सर्व वैद्यांना माहीत आहे" असें ते लिहितात. पण बऱ्याच वैद्यांना तें माहीत नाहीं आणि **वैद्यक** ग्रंथांतही वनस्पतिनाम म्हणून तें दिलेलें नाही. घायपातगणास तें योजलेलें दिसतें. कशावरून तें कळत नाही. रघुवीरांच्या यादींत २२ वें नांव शोभांजन हें आहे. कंसांत त्याचा पंजाबी पर्याय दिला आहे. पण मराठी दिला नाही तो शेवगा ( शिग्रु ) असा आहे. २८ वा शब्द अम्लवेतस हा आहे. आपण त्यास चुका ( चुक्र ) असें म्हणतों. ३३ वा शब्द शृंगार असा आहे तो शृंगाटक असा पाहिजे. २३ वा शब्द जीरकुल असा आहे. कंसांत 'जिरें' हा शब्द आहे. जिरें शब्दाने चार जातींचा बोध होतो. त्या जाती एकूण तीन गणांत मोडतात. ( १ ) जीरक, कोंथिंबीर गणांतलें, ( २ ) शहाजिरें त्याच गणांतलें, ( ३ ) अरण्यजीरक किंवा कडू जिरें कुसुंभ-गणांतलें, ( ४ ) कृष्णजीरक विषगणांतलें. या शेवटच्या जातीचें जिरें रघुवीरांना अभिप्रेत आहे असें शेजारच्या पाश्चात्त्य नामावरून कळतें.

आतां **रूढ शास्त्रीय नांवें** ... चाळून पाहतां त्यांत ४६ जातिनामें भारतीय आहेत असें दिसतें. याखेरीज ३९ जातिनामांत इंडिका मलबारिकम् निलगिरिकम् इ. भारतीय निर्देश आहेत. या स्थलवाचक नांवाऐवजीं भारतीय जातिवाचक नांव देणें सहज सुचतें. ६१८ गोत्रनामांपैकीं ११ भारतीय आहेत. बाकीची तयार करणें तीं त्या त्या गोत्रातल्या प्रतीकजातीच्या नांवावरून साधतां येतील. त्यास गोत्र हा शब्द पुढे जोडावा किंवा आदि शब्द जोडावा. जसें पनसादि लकुच. गण-प्रगणाचीं नांवेंही त्या त्या जातिप्रतीकाच्या नांवाला आद्य, आदिक असे शब्द जोडून करतां येतील हें उघडच आहे. जातिवाचकेंच तयार करावयास बरीच खटपट केली पाहिजे. एक सोपा मार्ग म्हणजे रूढ जातिवाचकेंच भारतीय वळण देऊन स्वीकारावयाचीं. ४६ जातिनामें पाश्चात्य परिभाषेंत गेलीं आहेत; त्याच न्यायाने शें पाचशें जातिनामें परकीयांचीं आपल्यांत येतील. जातिलक्षणावरून आपल्याला कांहीं नांवें स्वतंत्रतेनेंही बनवितां येतील. गतकालांत कांही नांवें आपल्या भाषेंत येऊन बसलेलीं आहेत किंवा आपण युक्तीनें तयार करून घेतलेलींही आहेत. त्यांवरून नवीन सुचण्यास साहाय्य होईल. या विषयीं कांही उदाहरणें पान ‍ ठेवण्यासारखीं आहेत. तीं अशीं:—

( १ ) गुलाब हा शब्द फारशीतून आला आहे. हिमालयावर वन्य गुलाब विपुल आहे. परंतु त्याचें विशेष संगोपन पारसीकांनी केलें असें दिसतें. आपण त्याजकडून तो शब्द आणि ती संवर्धन–विद्याही घेतली. उत्तम सुगंधी गुलाब दमास्कस् गुलाब म्हणून प्रसिद्ध आहे. (२) पानकोबी, फुलकोबी, नोलकोल, या तीनही उपजाती पाश्चात्यांकडून आपण घेतल्या आणि राहज कोबी हें नावही घेतलें. ( ३ ) बटाटा, रताळू हे कंद आपण परदेशाहून आणले. बटाटा शब्द जसाच्या तसाच घेतला आणि रताळू शब्द रक्त + आळू असा बनविला. उत्तरी लोक बटाट्यासही आळू म्हणतात हें प्रसिद्ध आहे. आपल्या मूळच्या परिचयाचा कंद म्हणजे अळू. त्यावरून नवे शब्द बनविले. भुईमूग हा परदेशांतून आलेला. त्याचें नांव मूग या सदृश द्विदलावरून बनविलें. शास्त्रीय परिभाषेंत त्याला हायपोजीया म्हणजे भूईखालीं राहणारा असें म्हणतात. ( ४ ) टमाटा हा शब्द परकीय आहे. त्याला पूर्वी बेलवांगें म्हणत. वांगें शब्दाचें मूळ वृन्ताक आहे. वृन्त म्हणजे देठ. ज्याचें देठ विशेष पुष्ट तें वृंताक असा शब्द निघाला असावा. वांगें उपवन्य आहे. तें वन्यापासून विशेष संवर्धनाने तयार केलेलें आहे. विशेष कमाईचा गुण दर्शवण्याकरता हा शब्द योजलेला असावा. ( ५ ) पेरू हें झाड परदेशागत आहे. नांवही परदेशीच असावें. जुन्या संस्कृत वाङ्मयांत त्याचें नांव नाही. पेरूच्या गणांतले आपल्याकडील झाड जांभळीचें. उत्तरेंत पेरूला जाम म्हणतात तें याच कारणानें असावें. जंबूवनांचा उल्लेख जुन्या वाङ्मयांत विपुल आहे. घायपात परदेशागत आहे. धारापत्र धारेचें पान असणारें झाड या अर्थी तो रूढ झाला असावा. ( ६ ) टणटणी किंवा घाणेरी हें कुंपणझुडुप म्हणून जिकडे तिकडे दृष्टीस पडतें. त्याचीं नांवें त्रियांच्या रूपावरुन आणि उग्र गंधावरून पडलेलीं असावींत. बाभूळ हें नाव जुन्या ग्रंथांत नाही. या गणांतला पूर्वपरिचयाचा वृक्ष खदिर हा होय. लाजाळू हें याच गणांतील झाड आहे त्यास खदिरपर्णी असें नाव आहे. शिरीष हें याच गणांतलें झाड आहे. त्याचा उल्लेख जुन्या ग्रंथांत आहे, लाजाळू किंवा बाभळीचा नाहीं. पानें परकीय स्पर्शानें मिटणें या स्वभावावरून लाजाळू हें नांव आलें. शास्त्रीय परिभाषेतील त्याचें नांव (प्यूडिका) देखील विनम्र या अर्थाचें आहे. बाभूळ हा शब्द परकीय असावा. ( ७ ) नारिंग शब्दाचा इतिहास मजेदार आहे. नागरंग असा संस्कृत शब्द आहे पण विशेष जुना नाही. वन्य नारिंगें हिमालयाच्या दऱ्यांत आहेत. तेथून तीं पाश्चात्यांनी युरोपांत नेऊन वाढविलीं. ओरेंज शब्दाचें मूळ नागरुंगो असें कोशकार देतात. अलीकडे नारिंगाचा पराभव मोसंब्यांनी केला आहे. हीं फळें मूळचीं मोझांबिक, म्हणून त्यांना हें नांव मिळालेलें आहे. नारिंगाबरोबर पाश्चात्यांनी कर्कटी म्ह. काकडीही नेली. त्यावरून कुकंबर शब्द तिकडे रूढ झाला. जाई, जुई, कुंद, मोगरा हीं सुगंधी फुलझाडेंही इकडून तिकडे गेलीं. त्यावरून जास्मीन शब्द ( पाश्चात्य ) शास्त्रीय परिभाषेंत उतरला. तो आज गोत्रवाचक झाला आहे. आणखी असे गोत्रवाचक शब्द आहेत तेः– कोधव → कडव, गांजा → कॅनॅबिस, कोष्ठ → कॉस्टस, तालीस → टॅक्सस्, आतिबला → ॲबूटिलॉन, धत्तूर → धतुरा, एला → एलटारिया, वंदा → वेंदा, बेबादम → वेन्टिलागो.

या विषयीं एक मजेदार गोष्ट अशी आहे कीं हिमालयांत ओकवृक्षाचीं मोठमोठीं वनें आहेत पण हिंदी भाषांत ओकवृक्षास नांव नाही. तसेंच आसामांत चहा वन्य स्थितींत पूर्वीपासून आहे. परंतु त्याची लागवड पाश्चात्यांनी तेथें सुरू केली. चहाचा परामर्ष पूर्वी आपण घेतला नव्हता म्हणून त्यास आपल्या भाषेंत नांव नव्हते. इंग्रजांनी चहा प्रथम

चीनांतून आणला. त्याच्या चिनी नांवांत आद्यभागीं टकार आहे. आणि अन्त्य भागीं चाय् कार आहे. आद्य भाग इंग्रजी भाषेंत आणि अन्त्य भाग भारतीय भाषांत उतरला.

सारांशः– पुष्कळ जातिवाचक नामें नवीन तयार करावीं लागतील तीं त्या त्या जातीच्या विशेष लक्षणावरून तयार करावीं लागतील. एकेक गोत्र घेऊन त्यांतील सर्व जातींना पृथक् नांवें योजिली पाहिजेत. गोत्रांनाही पृथक् नावें पाहिजेत. पण दोन भिन्न गोत्रांत जातिनामें भिन्न आलीं तरी चालेल. गोत्रनामावरून स्पष्टता येईल. कोणाही एका माणसाला सर्व जातींचा परिचय एकदम असणें संभवत नाही. म्हणून साक्षात् नामावळी परिभाषा मंडळानेंच तयार करून प्रकट करावी असें सुचवितो.

---

## नवीन सभासद

कै. चिपळूणकर स्मारकासाठी देणगी दिल्यामुळे झालेले

### हितचिंतक

१ श्री. विश्वनाथ हरी गोखले, 'संतोषभुवन,' टिळकरस्ता, पुणें २ ( रु. २०० )

### तहहयात

१ श्री. रघुनाथ केशव खाडिलकर, २९२/६ नारायण, पुणें २ ( रु. १०० )
२ श्री. छोटेलाल भगवानदास आगरवाल, जंगली महाराज रोड. पुणें ५ ( रु. १०० )

### साधारणचे तहहयात झालेले सभासद

१ प्रा. शं. गो. वाळिंबे, १७०रामबाग, इंदूर.
२ श्री. विठ्ठल गणेश ताम्हणकर, १३ गणेशचाळ, शास्त्री हॉल, मुंबई ७
३ श्री. रघुनाथ धोंडो कर्वे, १३ नवी भटवाडी, मुंबई ४.

### तहहयात

१ श्री. नारायण सीताराम कुलकर्णी, १३७ गुरुवार पेठ, सातारा.

### साधारण सभासद

१ श्री. बाळकृष्ण काशिनाथ पराड, ६८८ शुक्रवार, पुणें २,
२ सौ. सुशिलाबाई विनायक पटवर्धन, पटवर्धन वकिलांचेकडे, जळगांव (पू. खा.)
३ श्री. हरि सखाराम गोखले, ३४६ सोमवार, पुणें २.
४ श्री. नरहर गंगाराम कुलकर्णी, समर्थ विद्यालय, तळेगांव दाभाडे ( जि. पुणें )
५ श्री. म. भा. भोसले, मु. पोष्ट—भिलवडी ( जि. सातारा )
६ श्री. सदाशिव हरि कुलकर्णी, ९९ शिवाजी पार्क, मुंबई २८
७ श्री. चिंतामण विनायक हेरवाडकर, ४३१/४७ पुरंदरे कॉलनी पुणें, २.
८ श्री. चिंतामण गोविंद जोशी, कृष्णा कॅनॉल, कऱ्हाड ( जि. सातारा )
९ श्री. अच्युत अनंत गोखले, १९६/८ सदाशिव, पुणें २
१० श्री. विठ्ठलराव केरूजी पाटील, शिरोळे ( सं. कोल्हापूर )
११ श्री. वामन रामचंद्र गाडगीळ, ८१ नारायण, पुणें २
१२ श्री. पुरुषोत्तम विश्वनाथ ऱ्हाळकर, ४१३ नारायण, पुणें २
१३ श्री. कृष्णराव शिवराम कोल्हटकर. मु. पो. शेंदूर्णी ( पूर्व खानदेश )
१४ श्री. गुणवंत दुंडाप्पा कोले, १० अ, गोखले बिल्डिंग, टिळक रस्ता, पुणें २
१५ श्री. आगुस्तीन मनवेल कोळी, मु.उत्तन, पोष्ट-भाईंदर ( जि. ठाणें )

# मराठी स्वराघात : ले० डॉ. ग. वा. तगारे.

स्वराघात (Accent) हा मराठी भाषाशास्त्रांतील एक अनिश्चित स्वरूपाचा व गुंतागुंतीचा विषय आहे. ब्लोक, टर्नर इ. पाश्चात्य पंडित व खेर, जोशी, नवलकर, दामले, कुलकर्णी इ. मराठी व्याकरणकार व भाषापंडित यांच्या या विषयावरील विवेचनाने आणखी गोंधळ झाला आहे. अशा स्थितींत स्वराघात व त्याचे प्रकार, मराठी ही प्राभायु–(प्राचीन भारत युरोपीय = Primitive Indo Europeou) भाषिक अवस्थेमधून विकसित झालेल्या भाषा–(भारत-पारसीक = Indo-Iranian) भाषासमूहातील भाआ–(भारतीय-आर्य= Indo-Aryan) भाषाशाखेची महाराष्ट्रांत विकसित झालेली अर्वाचीन अवस्था असल्यामुळे मराठी स्वराघाताचा वेदपूर्व, वैदिक, संस्कृत, प्राकृत व अपभ्रंशकाळांतून किंवा शास्त्रीय परिभाषेंत बोलावयाचें म्हणजे प्राभायु., प्राभाआ. (प्राचीन भारतीय आर्य= वैदिक व संस्कृत) मभाआ (मध्ययुगीन भारतीय-आर्य= प्राकृत-अपभ्रंश) अवस्थांतून विकसित झालेला सुसंगत इतिहास देऊन, मराठी स्वराघातासंबंधीं कांहीं नियम बसवणें उद्बोधक ठरेल. केवळ मराठीच्याच नव्हे तर इतर अर्वाचीन संस्कृतोत्पन्न भाषांच्या किंवा पारिभाषिक शब्दांत 'अभाआ. (अर्वाचीन भारतीय आर्य) भाषांच्या' स्वरप्रक्रियेची चर्चा करतांना स्वराघाताच्या चर्चेत न शिरतां विशिष्ट स्वर शब्दाच्या अन्त्य, उपान्त्य, आद्य, आद्येतर पण उपान्त्यपूर्व स्थानांत असता होणारीं रुपान्तरें (Alte'rations de'pendant de la place dans le mot) अथवा 'स्थान-नियत स्वरप्रक्रिया' देण्याचा प्रघात आहे. मराठीबद्दल तर 'मराठींतील स्वरांत जे फरक झाले आहेत ते त्या स्वरांचे त्या शब्दांत काय स्थान आहे यावर अवलंबून झालेले आहेत' असें प्रा. ब्लोकनी आपलें स्पष्ट मत दिले आहे (पाहा मभावि = मराठी भाषेचा विकास पृ. ६५)

## स्वराघात

प्रा. ब्लोक यांच्या मताचा विचार करण्यापूर्वी स्वराघाताविषयीं स्पष्ट कल्पना असणें जरूर आहे. आपण बोलतांना शब्दांचे सर्व अवयव सारख्याच तऱ्हेने न उच्चारतां त्यांपैकी कांहीं अवयव जरा अधिक जोराने किंवा स्पष्टपणें अथवा साघात उच्चारून इतरावर जरा कमी जोर देतो. उदा. ब्रह्मणस्पतिः, ईन्द्रशत्रुः credi'bility (पण फ्रेंचमध्यें मात्र cre'-di'-bi-li-te') हरीण, गुणवान्, बहीण, पल्याड (पलिकडे) इ. वरील उदाहरणांतील आघात एकाच स्वरूपाचे नाहीत. त्यांतील कांहीं स्वराघातांत स्वर कमीजास्त (उदात्त, अनुदात्त इ.) करणें तर कांहींच्या उच्चारांत फुफ्फुसांतून श्वास कमीजास्त प्रमाणांत जोराने बाहेर आणणें असे दोन्हीं प्रकारचें उच्चारण आढळतें. त्यापैकीं आवाज किंवा स्वर उदात्त, अनुदात्त अथवा स्वरित करून उच्चारण्याच्या स्वराघाताला 'गीतात्मक स्वराघात' (Pitch Accent किंवा Tone) म्हणतात आणि श्वासाच्या कमीजास्त जोरामुळे कंठांतील स्नायूंवर होणाऱ्या परिणामामुळे निर्माण होणाऱ्या विशिष्ट आघातास 'बलात्मक' स्वराघात (Stress Accent) असें म्हणतात. उदाहरणार्थ आपण एक ऋचा घेऊं.

क्षत्राय त्वं श्रवसे त्वं महीया इष्टये त्वमर्थमिव त्वमित्यै ।
विसदृशा जीविताभिप्रचक्ष उषा अजीगर्भुवनानि विश्वा ॥

ऋग्वे. १. ११३. ६.

उषादेवीच्या कार्यासंबंधी–ती चारी वर्णांच्या लोकांना आपापलीं कामें करण्यास जागी करते या अर्थाच्या – उपर्युक्त मंत्राचें सस्वर वाचन करतांना 'गीतात्मक' स्वराघात आढळतो. पण याच मंत्राच्या इंग्लिश अनुवादाचें वाचन इंग्रज माणसाप्रमाणें करूं. **(Awakening) one to (seek) royal power, another to (go after) fame, another for great endeavour, another to pursue as it were his (particular) object-Uṣas awakes creatures to look after their different modes of life.** हें इंग्रजी वाक्य वाचतांना श्वासाच्या कमीजास्त जोरामुळें उच्चारतांना होणारे विशिष्ट स्वराघात 'बलात्मक' (Stress Accent) होत.

भायु. भाषांतील स्वराघाताचें स्वरूप काय असावें याच्या अभ्यासास सुरुवात ओटो ब्योटलिंक (Otto Böhtlingk) यांच्या संस्कृतमधील स्वराघातावरील पुस्तकानें (Me'moires der Pettrsburger Akademie, 6th Series Vol.7) इ. स. १८४३–४४ सालीं झाली. बेनफेनी (Benfey) या पुस्तकाचें मे १८४५त Halleschen allegemeinen Literatur-Zeitung मध्ये परीक्षण करतांना ग्रीक व संस्कृतमधील स्वराघाताच्या तौलनिक अभ्यासाचें महत्त्व वर्णन केलें. अशाप्रकारें १०० वर्षांपूर्वी जरी भायु. भाषांतील स्वराघाताच्या अभ्यासाला सुरवात झाली तरी त्यामानानें तद्विषयक माहिती मात्र निराशा होण्याइतकी अत्यल्प आहे. भायु. स्वराघाताची माहिती मिळवण्यासाठी युरोपीय पंडितांनी (१) प्राचीन संस्कृत, ग्रीक व रोमन व्याकरणकारांची त्या त्या भाषांतील आघातासंबंधीं मतें, (२) स्वराघात असलेल्या वेदब्राह्मणग्रंथांच्या संस्कृत पोथ्या, बिझंटाईन परंपरेंतील ग्रीक हस्तलिखितें, आणि प्राचीन उच्च जर्मन (OHG) हस्तलिखित ग्रंथ, (३) व्हर्नरच्या नियमाप्रमाणें शार्मण्य भाषांतून होणाऱ्या ध्वनिविकारासारख्या लॅटिन, जुनी आयरिश, अर्वाचीन ग्रीक व इतर भायु. भाषांतील पद्यरचनांतील विशेष या सर्व साहित्याचा अत्यंत शास्त्रशुद्ध पद्धतीनें कसून अभ्यास करून शेवटी भायु. स्वराघाताबद्दल आपल्यास फारच कमी माहिती आहे आणि याहून अधिक माहिती मिळण्याची शक्यताहि कमी आहे असें कबूल केलें आहे. प्राभायु. स्वराघातासंबंधीं निश्चित स्वरूपाचे पुढील विशेष सांगता येतील.

(१) प्राभायु. भाषांतील स्वराघात फार प्राचीन काळीं बलात्मक असून निरानिराळ्या कालखंडांत त्यांचें रूपान्तर होत होत वेदकाळीं व प्राचीन ग्रीकमध्यें त्याला गीतात्मक स्वरूप आलें होतें. संस्कृतमध्यें प्राभायु. स्वराघाताचें स्थान व कालदृष्ट्या वेदकालाला निकटवर्ती असलेल्या प्राभायु. अवस्थेंतील आघाताचें स्वरूप कायम राहिलें आहे.

(२) प्राभायु. स्वराघात शब्दाचें आद्यस्थान व अंत्यस्थान यापासून कितीही अंतरावर व कोणत्याहि अवयवावर असावा. सामासिक शब्दांत मात्र प्राथमिक व दुय्यम (primary and secondary) स्वराघात असत.

(३) प्राभायु. मधील दोन शब्दावयवांचें एकत्रीकरण होऊन किंवा पुढील अवयवाचा लोप झाल्यामुळे संयुक्त (circumflex नामक) स्वराघात रूढ झाला होता. फ्रेंचमधील hôte,

flûte te'te इ. शब्दांत ^ या खुणेनें सुचवलेला आघात circumflex होता. तसेंच फ्रेंचमधील l'e'te', l'E'cosse इ. शब्दांत या खुणेनें दाखवल्या जाणाऱ्या आघाताप्रमाणें असणारा तीव्र स्वराघात (Acute Accent) प्राभायु. मध्ये असावा असें अर्वाचीन विद्वानांचें मत आहे.

(४) प्राभायु. स्वराघातामुळे वाक्यांतील पूर्वीच्या शब्दांना जोडून उच्चारले जाणारे पण स्वतः निराघात असलेले शब्द, (enclitics) निर्माण झाले. उदा. mou, moi, me सारखीं सर्वनामांचीं रूपें, ग्रीक te: लॅटिन que: सं. च सारखीं अव्ययें आणि वाक्यारंभीं नसलेलीं क्रियापदें, संबोधनें इ.

प्राभायु.तील स्वराघाताबद्दल झालेली आजपर्यंतची चर्चा लक्षांत घेता स्वराघात हा प्राभायु. भाषाशास्त्रांतील एक कच्चा दुवा किंवा अज्ञात विभाग आहे असें म्हणावें लागतें.

## प्राभाआ. स्वराघात

प्राभायु. कालानंतर प्राभाआ. कालांत भाषेंत स्वराघात होता आणि तो गीतात्मक होता असें निश्चित म्हणतां येतें. वेदभाषेंतील स्वर पिढ्यान् पिढ्या जमेच्या तसे संरक्षण केले गेल्यामुळे तत्कालीन आघाताचें स्वरूप आजसुद्धा सामान्य माणसाला ऐकू येऊं शकतें. प्राचीन भारतीय भाषाकोविदांनी वेदभाषेवर केलेल्या परिश्रमामुळे वेदभाषेंतील स्वराघाताचें यथार्थ स्वरूप निश्चित होऊन तो 'गीतात्मक' ठरला गेला तरी वेदभाषा ही वाङ्मयभाषा होती, प्रत्यक्ष व्यवहारांत तसें सस्वर बोललें जात असेलच असें नाही. उदाहरणार्थ 'हे अग्ने तुझीं व्रतें थोर आहेत. तूं आपल्या सामर्थ्यानें दोन्हीं जगें विस्तारिलीं आहेस.' अशी प्रार्थना करणारा वेदभाषक प्रत्यक्ष व्यवहारांत

'व्रता तें अग्ने महतो महानि
तव क्रत्वा रोदसी आ ततन्थ' (ऋ. वे. ३-६-५)

असें सध्या वेदपठणांत ऐकू येणाऱ्या विशिष्ट स्वराघातांनी युक्त असें न बोलतां नुसतें 'व्रता ते अग्ने महतो महानि । तव क्रत्वा रोदसी आ ततन्थ' अशा साध्या स्वरोच्चाराकडे झुकणाऱ्या भाषेंत बोलत असावेत. ब्राह्मणकालांत व तदनन्तर हळूहळू गीतात्मक स्वराघात कमी झाला हें संस्कृत वाङ्मयावरून उघड दिसतें. संस्कृतमध्ये निराघात शब्दावयवांचा लोप होत असे. उदा० सु-वर्ण > स्वर्ण, वैदिक-त्मन् < आत्मन् सुनुमः > सुन्मः, वि':<* अवि':' 'पक्षी' तु. लॅटिन avis अशा उदाहरणावरून खि. पू. पहिल्या सहस्रकांत संस्कृतमध्ये बलात्मक स्वराघात रूढ असावा असें याकोबीचें मत आहे (पाहा—'Über die Betonung im Klassischen Sanskrit und den Prakrit-Sprachen ZDMG XLVII पृ. ५७४–८२) आपण संस्कृत श्लोक न गातां किंवा वेदमंत्र सस्वर न म्हणतां साधे म्हणालों तर आपल्याला बलात्मक स्वराघात प्रतीत होईल. उदा०

यस्य व्रते पृथिवी नंनमीति
यस्य व्रते शफवज्जर्भुरीति ।
यस्य व्रत ओषधीर्विश्वरूपाः
स नः पर्जन्य महि शर्म' यच्छ ॥ (ऋ. वे. ५-८३-५)

'हे पर्जन्या, तुझ्या वर्षावाने पृथ्वी वाकते, पशुसृष्टि हालचाल करते आणि वनस्पती बहुरूपधारिणी होतात. तूं आम्हावर मोठी कृपा कर' या भावार्थाची उपर्युक्त ऋचा साध्या श्लोकाप्रमाणे वाचतांना कांही शब्दावयवावर स्वराघात द्यावा लागतो तर कांही निराघात उच्चारावे लागतात. हे स्वराघात व ही ऋचा सस्वर म्हटली गेली अगर गाइली गेली तर ऐकूं येणारे स्वराघात एक नव्हत हें तुलनात्मक दृष्टीने ऐकणाऱ्याच्या तेव्हांच लक्षांत येईल. संस्कृत श्लोकाच्या या साध्या वाचण्यांत येणारा स्वराघात 'बलात्मक' स्वरूपाचा आहे असें ब्यूलर व याकोबी यांचें मत आहे. (ब्यूलर—'Leitfaden für den Elementarcursus des Sanskrit व्हिएन्ना १८८३) याकोबींनी ZDMG ४७ मधील वर उल्लेखिलेल्या निबंधांत संस्कृतमधील हा 'बलात्मक' स्वराघात शब्दाच्या अंत्यस्थानाकडून पहिल्या असणाऱ्या गुरु (छंदोरचनेच्या दृष्टीने—) शब्दावयवावर असून पहिल्या शब्दावयवावरील आघात दुय्यम प्रतीचा (Secondary ) असावा असें आपलें मत दिलें आहे. युरोपीय भाषांपैकी लॅटिनमध्ये अशा तऱ्हेचा स्वराघात असल्यामुळे या बलात्मक स्वराघातास 'लॅटिन स्वराघात' अशी संज्ञा सोईसाठी वापरलेली आढळते.

## मभाआ. स्वराघात

ख्रि. पू. ६०० पासून मभाआ. कालाला सुरवात होते. त्यामुळें मभाआ. भाषांत स्वराघात होता का, असल्यास कोणत्या स्वरूपाचा होता व त्याचा विकास होत जाऊन अभाआ. अवस्थेंत त्याचें काय रूपांतर झालें याचा विचार केल्यास काव्यनाटकांच्या संस्कृतमध्यें कशा तऱ्हेचा स्वराघात होता आणि अभाआ. तील स्वराघाताची ऐतिहासिक पार्श्वभूमि काय आहे याचा खुलासा होईल. संस्कृतप्रमाणें मभाआ भाषा आज 'मृत' असल्यामुळे त्यांतील स्वराघातांची चर्चा 'काल्पनिक' वाटण्याचा संभव आहे. पण ज्यांच्या मातृभाषेंत आज स्पष्ट स्वराघात असून, आघात, त्याचें स्वरूप व परिणाम यांची ज्यांना स्पष्ट कल्पना आहे अशा याकोबी, पिशल, गायगर, ग्रियर्सन, टर्नर इ. ख्यातनाम युरोपियन पंडितांच्या लिखाणाच्या आधारावर ही चर्चा केली असल्यामुळे हिला 'तर्कशुद्ध', 'अनुमित' या अर्थाचें निगमनात्मक स्वरूप दाखविणारें विशेषण योग्य ठरेल. प्रथमतः आपण मभाआ. च्या जुन्या अवस्थेंतील कांही उदाहरणें घेऊं. पालीमध्ये कोणत्या स्वरूपाचा स्वराघात आहे याबद्दल पाली व्याकरणकार मुग्ध असले तरी आघात नसलेल्या शब्दावयवांचा त्या मार्गेत लोप आढळतो. उदा. दक < उदक, दानीं < इदानीम्, अग्ग < *अग्^अर < *अगर < अगार 'घर'. गायगरनी आपल्या पालीवरील ग्रंथात (Pali, literatur und Sprache § ४, §§१९–२४). पालीमधील स्वराघातासंबंधी पुढील माहिती दिली आहे.

(१) सं. मध्ये पहिल्या शब्दावयवावर आघात असणाऱ्या ३ किंवा ४ अक्षरी शब्दांत दुसऱ्या अवयवातील स्वरावर परिणाम होऊन त्याचे—इ—मध्यें (ओष्ठ्य वर्णानंतर व कधीकधी इतरत्र—उ-मध्ये) रूपांतर होतें. उदा० चंदिमा < चन्द्रमस् 'चंद्र', चरिम < चरम 'शेवटचा', गेरुक < गैरिक 'काव', मुदिता < मृदुता.

(२) स्वराघातानंतर येणाऱ्या ऱ्हस्व स्वराचा कधीकधी लोप होतो. उदा० जग्गति < * जाग्रति < * जागरति < जागर्ति, अग्ग < अगार 'घर'.

(३) स्वराघातापूर्वीच्या अवयवांतील दीर्घ स्वराला केव्हा केव्हा ह्रस्वत्व येतें. उदा० कहापण< कार्षापण 'एक नाणें', तसेंच दुजिह्व, द्विजिह्व. पण स्वराघात असल्यास : दिवद< द्विपद.

(४) स्वराघात दुसऱ्या शब्दावयवावरून आद्यावयवावर आल्यामुळे दुसऱ्या शब्दावयवातील (अक्षरांतील) स्वर ह्रस्व होतो. उदा० दुतिय< द्वितीय, अलिक< अलीक 'खोटें'.

(५) वर दिल्याप्रमाणे स्वराघात बदलल्यामुळे २ ऱ्या शब्दावयवांतील स्वर ह्रस्व असल्यास त्याचें स्वरूपच कधी कधी बदललेलें आढळतें. उदा० मुतिंग< मृदङ्ग. पज्जुन्न< पर्जन्य. येथें १ल्यांत–अ–> –इ–व दुसऱ्यांत–अ–> उ झाला आहे.

(६) या नवीन तऱ्हेच्या (बलात्मक) स्वराघातामुळे पहिल्या शब्दावयवांतील स्वर ह्रस्व असल्यास तो कधीकधी दीर्घ होतो. उदा० आजिर< अजिर 'अंगण', आलिंद < अलिन्द 'वाड्याच्या पुढील भागांतील गच्ची'.

(७) वर दिल्याप्रमाणे स्वर दीर्घ न करता दुसऱ्या अवयवांतील साध्या व्यंजनाचें द्वित्व झालेलें कधी कधी आढळतें. उदा० कुम्मग्ग< कुमार्ग, उम्मा< उमा (उम्मापुप्फ 'एक रत्न')

(८) निराघात अंत्य स्वर ह्रस्व होतो. उदा० असु< असौ 'तो', सज्जु< सज्जो < सद्यः 'तात्डतोब', सच्छि< *साक्षम् 'समोर'.

या व यासारख्या इतर उदाहरणावरून असें दिसतें की प्राभाआ काव्यांतील गीतात्मक स्वराघात पालीवाङ्मयाच्या काळापर्यंत राहणें शक्य नसलें तरी याकोबींनी प्राकृत भाषांबद्दल सुचवल्याप्रमाणे हा संस्कृत काव्यनाटकाच्या काळांत आढळणाऱ्या स्वराघातासारखा 'बलात्मक' असावा.

प्राकृत वाङ्मयांत (मभाआ. चे द्वितीयावस्थेंत) कोणत्या स्वरूपाचा स्वराघात असावा याबद्दल मतभेद आहेत. (उदा० पिशल KZ ३४-५६८ व नंतर ३५-१४० व पुढे, प्राकृत भाषांचें व्याकरण §४६ पण त्यांचे उलट याकोबी ZDMG ४७-५७४ पासून KZ. ३५-५७८ व नंतर. तसेंच ग्रियर्सन ZDMG ४९-३९५ व पुढें JRAS १८९५ पृ. १३९ नंतर; मिशलसन् IF २३-२३१). या विद्वान् पंडितांच्या वादांत पडण्यापूर्वी आपण या अवस्थेंत स्वराघात होता की नाही हें पाहूं. मभाआ. च्या द्वितीयावस्थेपूर्वी अर्धमागधीत आपल्यास पुढील उदाहरणें आढळतातः रहट्ट< अरघट्ट 'रहाट', ढिल्ल< सिढिल्ल< * शृथिर = शिथिल 'ढिला', पोप्फल< पूगफल 'पोफळ', उक्खल< * उद्खल< उदूखल. या व इतर उदाहरणांवरून निराघात शब्दावयवांचा लोप करण्याची प्रवृत्ति सं., पालीप्रमाणे अर्धमागधींत व प्राकृतांत होती असें दिसतें. पालींतील स्वराघातामुळे आढळणाऱ्या स्वरान्तराप्रमाणे अर्धमागधींत सुद्धा स्वराचे बदल होतात. उदा० नउइ< नवति 'नव्वद', पाउरण< प्रावरण, मज्झिम< मध्यम (ध्य–> ज्झ म्हणून हें संप्रसारण नव्हे); क्खु< *ख्$^{अ}$लु< खलु 'खरोखर', कहावण < कार्षापण, तइय< तृतीय, पाणिय< पानीय; या व इतर उदाहरणांवरून अर्धमागधींत व इतर प्राकृत भाषांत स्वराघात होता हें निर्विवाद आहे. प्रश्न एवढाच आहे की, हा आघात गीतात्मक होता की बलात्मक होता. याकोबींचें मत असें आहे की हा स्वराघात काव्यनाटकांच्या संस्कृताप्रमाणे 'बलात्मक'–लॅटिन भाषेंतील स्वराघाताप्रमाणे–असावा. ग्रियर्सन यांनी

१८९५ मध्ये 'On the Stress Accent in the Modern Indo-Aryan Vernaculars' (JRAS पृ.१३९ व पुढे) ह्या लेखांत अभाआ. तील स्वराघाताचा विकास मभाआ.च्या जुन्या अवस्थेंत असणाऱ्या 'लॅटिन' स्वराघातापासून झाला असें प्रतिपादन केलें आहे.

स्वराघाताचा युरोपीय भाषांतील इतिहास व स्वरूप पाहातां, तो एक अस्थिर स्वरूपाचा भाषाविशेष दिसतो. त्यामुळे शिष्ट भाषेंत एका विशिष्ट स्वरूपाचा स्वराघात रूढ असेल तर अशिष्ट भाषेंत किंवा बोलींत तो तसाच असेल असें सांगतां येत नाही. वेदकालांतील शिष्ट वाङ्मयांत गीतात्मक स्वराघात रूढ होता; पण प्रत्यक्ष बोलींत बलात्मक स्वराघाताकडे प्रवृत्ति असल्यामुळे तिची काव्यनाटकांचे संस्कृत, वाङ्मयीन प्राकृत या कालांत वाढ होऊन बंगाली, गुजराती, हिंदी, पंजाबी, मैथिली इत्यादि भाषांत आज आढळणारा 'बलात्मक' स्वराघात रूढ झाला. यांत जसें अस्वाभाविक कांही नाही तसेंच या मोठ्या देशांत भिन्न प्रांतांत भिन्न प्रकारचे स्वराघात फार प्राचीन कालापासून अस्तित्वांत असणें अनैसर्गिक नाही. पिशलनी आपल्या 'प्राकृत भाषांच्या व्याकरणांत' हेंच सांगितलें. त्यांच्या मतें माहाराष्ट्री, अर्धमागधी, जैन महाराष्ट्री व अपभ्रंश काव्यें यांत वेदकालीन स्वराघात (निदान स्वराघाताच्या शब्दांतील स्थानाचे दृष्टीने तरी) कायम राहिला आहे. परंतु शौरसेनी, मागधी, ढक्की (उत्तर पंजाबमधील मभाआ. बोली) या भाषांत काव्यनाटकांचें संस्कृतांत आढळणारा नवीन 'लॅटिन'-बलात्मक- स्वराघात आहे. [ पाहा —पिशल *Grammatik* § ४६ पृ. ४८. पिशल यांना येथें अभाआ. स्वराघाताची चर्चा करावयाची नसून मभाआ. मधील त्या विशेषाबद्दल लिहावयाचें होतें. आणि अभावितपणें त्यांनी अभाआ.चे दृष्टीने महत्त्वाचें मत मांडलें आहे. ]

ऐतिहासिक भाषाशास्त्राचे दृष्टीने त्यांनी भौगोलिक स्थानपरत्वे स्वराघाताची द्विविध विभागणी केली. त्यांचे मते मभाआ. कालांत भारतवर्षाच्या नैर्ऋत्य विभागांत वेदकालीन स्वराघात (स्थानदृष्ट्या तरी) कायम राहिला असून मध्य, उदीच्य व प्राच्य विभागांत (शौरसेनी, मागधी व ढक्की भाषा बोलल्या जाणाऱ्या भागांत) लॅटिन स्वराघात रूढ होता. अर्धमागधींतील जैन धर्मग्रंथांचें शेवटचें संस्करण काठेवाडमध्यें वलभी येथे झालें आणि अर्धमागधी व 'जैन शौरसेनी'चा वाङ्मयदृष्ट्या उपयोग नैर्ऋत्यविभागांतच झाल्यामुळे या भाषांना या विभागांत गणलें आहे. हिंदी, राजस्थानी, गुजराती, पंजाबी, सिंधी, भोजपुरिया, मैथिली, बंगाली इत्यादि भाषांत आज बलात्मक स्वराघात आढळत असल्यामुळे पिशल यांच्या शौरसेनी, मागधी व ढक्की भाषामधील आघाताबद्दलच्या मताला पुष्टि मिळते. नैर्ऋत्य भाषाविभागांतील मभाआ. स्वराघात अद्याप मराठींत आढळतो. आणि या बाबतींत शौरसेनी विभागांत मोडणाऱ्या गुजरातीराजस्थानीशीं तिचें भिन्नत्व आढळतें असें मराठी व गुजराती वर्णप्रक्रियेवर प्रमाणभूत मानले गेलेले पंडित प्रा. टर्नर यांचें मत आहे. ( पाहा—'Indo-Germani Accent in Marathi 'JRAS 1916 पृ. २०३--५१ )

## मराठी स्वराघात

संस्कृत व प्राकृत या 'मृत' अवस्थेंत असल्यामुळे त्यांच्यामधील स्वराघाताची चर्चा अनुमानात्मक असणार. पण आज प्रत्यक्ष बोलल्या जाणाऱ्या मराठींत स्वराघात आहेत की नाहीत या मुद्द्यावर व्याकरणकारांत तीव्र मतभेद असावेत याचें आश्चर्य आहे. दादोबा

पांडुरंग, गोडबोले, चिपळूणकर यांना स्वराघाताची फारशी कल्पना नव्हती याबद्दल विशेष वाटत नाही. पण खेर, जोशी, नवलकर, दामले यांनी स्वराघातावर केलेली चर्चा पाहिली म्हणजे नवल वाटतें. एका व्याकरणकारानी संयुक्त व्यंजनापूर्वी, विसर्गापूर्वी अथवा अनुनासिकापूर्वी येणाऱ्या स्वरावर जो जोर द्यावा लागतो तो वगळल्यास मराठीत प्रत्येक शब्दाचा उच्चार सम-स्वर असतो असें म्हटले आहे; तर दुसऱ्यानी accent संस्कृतात व मराठींतहि स्पष्टपणें कोठेच दृष्टीस पडत नाही असें आपलें मत दिलें आहे. मराठी वैयाकरणांना स्वराघाताची कल्पनाहि नाही किंवा तिचा उल्लेख करण्यास त्यांना शब्दहि माहित नाही असें दिसतें' ही ब्लोकनी *La Langue Marathe* §३४ मध्यें केलेली टीका अद्यापहि खरी आहे. खेरांनी दिलेले मराठी आघातासंबंधीचे नियम व दामल्यांनी केलेलें त्यांचें 'खंडन' (शास्त्रीय मराठी व्याकरण पृ.४८-५४) दोन्हीहि 'अशास्त्रीय' आहेत. त्यामुळे मराठी बोलीशी फारसा प्रत्यक्ष संबंध न आलेल्या ब्लोकसारख्या फ्रेंच पंडितांना नवलकराचा अनुवाद करून मराठीत स्वराघात नसून "स्वराच्या मात्रांत व क्वचित् प्रसंगीं उच्चारांत सुद्धा जे ठराविक फरक होतात ते फक्त लघु-गुरु अक्षर क्रमाच्या नियमाने (quantitative rhythm ) सिद्ध होतात असें मानणें युक्त ठरतें" ( मभाधि §३६ ) असें मत देऊन या गुंतागुंतीच्या प्रश्नाला बगल दिली.

वस्तुतः मराठींत स्वराघात आहे की नाही हा प्रश्नच उद्भवत नाही. कान उघडे ठेऊन वावरणाऱ्या कोणत्याहि सामान्य सुबुद्ध माणसास ऐकूं येण्याइतका तो स्पष्ट व वादातीत आहे. व्याकरणकारानी कांहीहि लिहलें तरी अडचण, पितळ, शहाणपण इ. शब्द नुसते साधे- निराघात उच्चाराचे- अ- ड- च- ण, पि- त- ळ, श- हा- ण- प- ण, असे नाहीत हें कोणीहि सांगेल. आघाताच्या अस्तित्वाला प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे स्वतः मराठी बोलणाऱ्या लोकांच्या समाजांतील निरनिराळ्या थरांत व महाराष्ट्राच्या निरनिराळ्या विभागांत भाषा कशी बोलली जातें हें ऐकणें. ग्रंथांतरीचीं प्रमाणें मांडण्यापेक्षा हा जिवंत पुरावा मराठींत स्वराघात आहे हें सिध्द करण्यास पुरेसा आहे. मराठींत स्वराघात आहे की नाही ही चर्चा करणारे नास्तिपक्षाकडे झुकणारे व्याकरणकार नकळत मराठी आघाताचें अस्तित्व मान्य करून त्याचें स्वरूप निश्चित करण्याचा प्रयत्न करतांना दिसतात ( पाहा- दामले- शास्त्रीय व्याकरण पृ. ४१-५४ ) यांचें कारण त्याचें मराठींतील अस्तित्व होय.

मराठी स्वराघातासंबंधी भांडारकरांनी पुढील माहिती आपल्या विल्सन फायलॉलॉजिकल लेक्चर्समध्ये दिली आहे. ( पृ. १५२-१६५ ) ही व्याख्यानें इ. स. १८७७मध्ये दिली असून प्रस्तुत व्याख्यान ( ४ थें ) १८८९ मध्ये प्रसिध्द झालें. हा इतिहास लक्षांत घेतला म्हणजे यांतील मतांच्या जुनेपणाचें कारण अर्वाचीन पद्धतीच्या मांडणीचा अभाव- लक्षांत येईल. ग्रियर्सन यांची भाषिक पाहणी ( Linguistic Survey of India ) डोळ्यासमोर नसतांना अखिल भारतीय आर्यभाषांच्या पार्श्वभूमीवर केलेलें विवेचन विचारार्ह असल्यामुळे देत आहे:

. अभाआ. त स्वराघाताच्या नियमांनी स्वरप्रक्रियेंत महत्वाचे बदल झाले आहेत. शद्बांतील उपान्त्य अक्षरावर (Syllable) आघात आल्यामुळे अंत्य स्वराचा लोप झाला. सं. मधील अंत्य-इ,-उ, यांचे निराघात-अ मध्ये रूपांतर झालें. उदा. म. हिं. गु. पद्धत < पद्धति, म. हिं. पं. गु. बं. जात < जाति, म. गु हिं. पं. मध < मधु. सिंधीमध्ये मात्र जुने-इ, उ शिल्लक राहिले आहेत सं. रात्रि > सिं. राति पण म. हिं. पं. बं. गु.

रात, सं. विद्युत् > सिं. विजु पण म. गु. वीज, पं. बिज. मभाआ. कालांत जर अंत्य व उपान्त्य स्थानांत लागोपाठ स्वर आले तर अन्त्य स्वराचा निराघात असल्यामुळे लोप-होऊन, मूळ शब्दांतील साघात उपान्त्य स्वर दीर्घ होतो आणि अभाआ. त तो शब्द दीर्घ स्वरान्त आढळतो. उदा. सं. मौक्तिक > मोत्तिअ > म. गु. पं. हिं. मोती. सं. यूका > जूआ > हि. पं. गु. जू. म. ऊ, सं. पारद > पारअ > म. हिं. पं. बं. ओ. पारा.

मराठी दीर्घस्वरान्त शब्द (तत्सम वगळता) मूळ शब्दांतील निराघात अन्त्य अक्षराचा लोप होऊन मूळच्या साघात उपान्त्य स्वराचें दीर्घीकरण होऊन बनलेले असतात व अशा वेळीं तें दीर्घ अन्त्याक्षर साघात राहतें. उदा. सं. भद्रक=*भद्-ल-क > प्रा. भल्लअ> म. हिं. पं. भला. हें दीर्घ अन्त्याक्षर साघात उच्चारलें जाण्यासाठीं तत्पूर्वीचा दीर्घ स्वर पुष्कळदा ह्रस्व होतो. उदा. सं. कीटक > प्रा-कीडअ > किडा; तसेंच सं. पीठिका > पिढी. उपान्त्य अक्षर साघात असल्यामुळे जसा अन्त्य स्वराचा लोप होतो त्याप्रमाणे अन्त्याक्षर साघात असेल तर उपान्त्य स्वराचें ह्रस्वीकरण वा लोप होतो. उदा. अङ्गुष्ठक > अंगुट्ठअ > अं (आं) गठा या शब्दांतील-ग-मधील-अ-प्रत्यक्ष उच्चारांत लुप्त होऊन 'आंग्ठा' असें रूप ऐकूं येतें. तसेंच श्वशुरक > सास्रा.

शब्दांतील आद्याक्षर निराघात असल्यास इतर भाषाप्रमाणे मराठींत त्याचा लोप होतो. उदा. अरघट्ट > रहाट, हिं. रहट, सं. उप- विश् > उव (ब) इस > म. हिं. बं. ओ. बैस, गु. बेस.

मराठी भाषा 'मृत' आहे असें मानून जरी विचार केला तरी या भाषेतील आघातासंबंधी पुढील मुद्दे स्पष्ट होतात. मराठींत आघात आहेत हें निर्विवाद सिद्ध होतें हें निराळें सांगण्याची जरूरी उरत नाही.

(१) मराठींत आघातामुळे ह्रस्व-दीर्घत्वाची उलटापालट होते. उदा. दीपक > * दीवंअ > दिवा, वीटिका > वीडिआ > विडी पण हिं. बीडी, द्यूतक > जुवा, शिकणें > शीक आज्ञा. द्वि. ए. व., रुसणें > रूस, कापडः कापाड, पातळः पाताळ, धोतरः धोतार या अनुक्रमें शिष्ट व अशिष्ट भाषांत आढळणाऱ्या जोड्यांतील- अ- चे दीर्घत्व तो साघात असल्यामुळेंच आहे.

( २ ) स्वराघात असलेले स्वर कायम राहतात पण निराघात इ, उ चे अ होऊन प्रत्यक्ष उच्चारांत त्यांचा लोप होतो उदा. भगिनी > बहीण, पुनव < पूर्णिमा. सासरा < श्वशुरक आंगटा < अङ्गुष्ठक. पण नांव < नामन्, गांव < ग्राम, खीर < क्षीर इ. शब्दांत स्वराघातामुळे कांही बदल झाला नाही.

( ३ ) निराघात शब्दावयव शब्दाचें आद्यस्थानीं आल्यास त्याचा कधीकधी लोप होतो. पण तो शब्दाचे अंती असला आणि मभाआ. अवस्थेंत त्याचे केवळ स्वरत्व शिल्लक असलें तर अभाआ. काळांत-मराठींत सुद्धां-त्याचा लोप होऊन उपान्त्य स्वर दीर्घ होतो. उदाहरणार्थ आद्यस्थानीं उपरि > वर, अभ्यञ्जनक > भिजणें, अभ्यन्तर > भीतर. आद्याक्षरावर पुष्कळदां आघात असल्यामुळे असली उदाहरणें कमी आहेत.

अन्त्यस्थानीं : शाटिका > साडिया > साडी', युगम् > जुअं > जूं', वालुका > वालुआ > वाळू, वाटिका > वाडिआ > वाडी', आमलक > आमलअ > आंवळा, गोलक > गोलअ > गोळा.

( ४ ) आघातामुळे कधी कधी अक्षरांचे द्वित्व झालेलें आढळतें. उदा. वान्नर < वा'नर, लल्लाट < लला'ट, मन्नोरथु < मनोरथ ( उद्धव गीता ४६४ ) इस्लामी आक्रमणानंतर अम्मल, अद्दल, नक्कल, कत्तल इ. शब्दांतील रूढ झालेले द्वित्व वर्ण स्वराघातामुळे झाले असें मानतात.

( ५ ) तत्सम शब्द समासांत वा नुसता वापरला तर त्याचा मूळचा स्वराघात कायम असतो. उदा. शुष्क, अव्यक्त, दयासागर, गुणवती इ.

( ६ ) एकच शब्द भिन्न अर्थी वापरतांना त्यापैकी एक शब्द दुसऱ्यापासून भिन्न आहे हें दाखवण्यासाठीं भिन्न स्थानीं स्वराघात येतो. उदा. डा'ळ ( कडधान्य ) : डाळ', ( खाण्याचा एक पदार्थ ) शिष्टरूप—डाळें, बै'ल ( एकवचन ) बैल' ( अनेकवचन )—अशिष्ट बोलींत, लावण्या'स ( पेरण्यासाठीं ) लाव'ण्यास ( सौंदर्याला )

संयुक्त व्यंजनाचे पूर्वी असणाऱ्या अक्षरावर ( उदा. प'क्का, श'ब्द चि'त्र, ह'ल्ला ), ऱ्हस्व स्वरानंतर येणाऱ्या अनुस्वारामुळे ( अं'श, ब'ंड, अं'क इ. ) किंवा विसर्गापूर्वी असणाऱ्या स्वरावर ( उदा० दुःख, अंतःकरण ) जो विशिष्ट जोर येतो तो स्वराघातामुळे नसून तीं व्यंजनसंयोगाची उदाहरणें आहेत हें ब्लोक यांचे म्हणणें मान्य करूनसुद्धा मराठींत स्वराघात आहेत हें वरील ६ प्रकारांवरून दिसेल.

मराठी स्वराघात सामान्यतः उपान्त्य अक्षरावर व अन्त्याक्षरांचा लोप होऊन उपान्त्य स्वराला दीर्घत्व येऊन अन्त्यस्थान झाल्यास अन्त्यस्थानावर व पुष्कळदां आद्याक्षरावर आढळतो. त्यामुळें या स्थानाच्या स्वरप्रक्रियेंत बहुधा फारसा फरक नसतो असें तज्ज्ञांचें मत आहे.

ऐतिहासिक दृष्ट्या विचार करता प्राभायु. भाषांतील स्वराघातास प्राभाआ. कालांत 'गीतात्मक' स्वरूप प्राप्त होऊन त्याचें स्थान न बदलता तो नैऋत्येकडील मभाआ. भाषांत कायम राहिला. मराठी ही याच विभागांत बोलली जात असून तिचे पूर्वरूप जी महाराष्ट्री तिच्यांत आपले वेदकालीन स्थान न बदलता स्वराघात कायम राहिला आहे. टर्नरनी आपल्या The Indo-Germanic Accent in Marathi ( JRAS 1916 पृ. २०-३-५१ ) या लेखांत गुजरार्थीमध्ये विशिष्ट—बलात्मक स्वरूपाचा—स्वराघात असून तो मराठीपेक्षा भिन्न आहे आणि प्राभायु स्वराघात प्राभाआ अवस्थेंत ( वेदांत ) जसा कायम राहिला तसाच स्थान न बदलता ( पण गीतात्मकाऐवजी विशिष्ट तऱ्हेचें 'बलात्मक' स्वरूप धारण करून ) मराठींत राहिला आहे असें दाखवलें आहे.

वरील पुरावा लक्षांत घेतां मराठी स्वराघातावरील प्रा. ब्लोक यांचें La Langue marathe मधील मत इतिहासजमा झालें आहे हें लक्षांत येईल. ब्लोकनी भांण्डारकर स्मारक ग्रंथांतील A propos d'accent' d'Intensite, eu indo-aryen या निबंधांत व पुढें L. indo aryen पृ. ४७–४९ मध्ये स्वराघातासंबंधीं आपलें मत सुधारून घेतलें आहे. तथापि अस्पष्ट स्वराघात असलेल्या शिष्टभाषेपेक्षां ती ज्या बोलीवर आधारली आहे त्यांच्यामधील स्वराघाताचें निरीक्षण व अभ्यास होणें आता आवश्यक आहे.

———

म. सा. प. (२१-१-४)

# संपादकीय

## पुणें विद्यापीठ

पुणें विद्यापीठ स्थापण्याचें बिल पास झालें, त्याचा नुकताच कायदा झाला आणि आतां तें लवकरच अस्तित्वांत येईल. त्याच्या पूर्वसिद्धतेसाठीं कुलपति नेमण्यांत आले असून त्यांना लागणारें मदत-मंडळहि नुकतेंच जाहीर झालें आहे. कुलपति-पदावर नेक नामदार डॉ. मुकुंदराव जयकर यांची नेमणूक झाली आहे. ही जशी अभिनंदनाची गोष्ट आहे तशीच ती औचित्यपूर्णहि आहे. ह्या विश्वविद्यालयाची कल्पना मूळ धरूं लागल्यापासून आणि बळ करूं लागल्यापासून नामदार जयकर हे तिच्याशी समरस झालेले आहेत आणि या प्रयत्नांत प्रामुख्यानें वावरत आहेत. या कामीं एप्रिल १९४३ मध्ये जें शिष्ट मंडळ मुंबइचे त्यावेळचे नामदार गव्हर्नर सर फ्रेडरिक साईक्स यांचे भेटीस गेलें होतें त्याचें नेतृत्व नामदार जयकर यांचेकडेच होतें. तेव्हां अशा तद्रूप झालेल्या धुरीणाकडेच ह्या विश्वविद्यालयाचें कुलपतिपद आलें आहे ही समाधानाची गोष्ट असून त्याच्या करवीं हा रथ कौशल्याने चालू होईल अशी उमेद आहे.

महाराष्ट्र विद्यापीठाची स्थापना ही म. सा. परिषदेची कितीक वर्षांची मनीषा सफळ होत असल्यामुळे परिषदेला आज आनंद व्हावा हें स्वाभाविकच आहे. महाराष्ट्र युनिव्हर्सिटी कमीटीच्या अहवालांत ह्या "विद्यापीठाची चळवळ" महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या १९२६ मधील मुंबई अधिवेशनांतील ठरावापासून नमूद करण्यांत आली आहे. पण खरें पाहूं जातां महाराष्ट्रांत स्वतंत्र मराठी विद्यापीठाची आवश्यकता १९२१ सालीं बडोद्यास भरलेल्या म.सा. संमेलनांतच एका ठरावाच्या रूपाने घोषित करण्यांत आली होती. आणि नंतर १९२६ सालापासूनच्या पुढील अधिवेशनांतून वेळो वेळीं ह्या मागणीचा आग्रहपूर्वक पुनरूच्चार करण्यांत आला. लवकरच १९२८ मध्ये महाराष्ट्र युनिव्हर्सिटी असोसिएशन ही संस्था ह्याच उद्योगासाठीं अस्तित्वांत आली. त्या संस्थेचे कार्यवाह प्रा. द. वा. पोतदार यांनी प्रांतांत दौरा काढून लोकमताचा पाठिंबा मिळवून ह्या कार्याला जोराची चालना दिली. सारांश, परिषद आणि परिषदेचे पदाधिकारी ह्यांनी प्रयत्नपूर्वक चिंतिलेलें स्वप्न साकार होत आहे.

आता प्रांतांतील सर्व विद्वानांचें, सर्व पुढाऱ्यांचें आणि शिक्षण संस्थांचें जीवेंभावें सहकार्य लाभून हें विश्वविद्यालय 'मराठीचिये नगरीं' पूर्ण प्रतीष्ठेने नांदो आणि मराठीचा चढतावाढता संसार इतर थोर थोर भाषा-भगिनींच्या संसारांसमवेत विश्वमान्यता पावो.

* * *

## मराठीचिये नगरीं

मुंबईचे साक्षेपी व महत्वाकांक्षी प्रकाशक के. भि. ढवळे यांनी कर्नाटक मुद्रणालय खरेदी करून व मुद्रणाविषयक साधनांनी सर्वांगीण वाढ करून आपला विस्तृत प्रपंच शीव येथें उभारला आहे. 'खेळगडी' ह्या बालवाचकांच्या मासिकाचें मुद्रण-प्रकाशनादि सर्व प्रकारचें संगोपनहि कांहीं महिन्यापूर्वी त्यांनी पत्करलें आहे.

आता त्यांनी मुद्रण-प्रकाशनविषयक वार्तेस वाहिलेलें 'मराठीचिये नगरीं' हें मासिक पत्रक सुरू करून नवीनच प्रयोग आरंभिला आहे. नवीन महत्वाच्या निवडक ग्रंथांवर मार्मिक अभिप्राय, वार्ता, चर्चा, अधिकारी व्यक्तींचे प्रासंगिक विचार असा वाचनीय भाग ह्यांत येणार आहे. ग्रंथकार, ग्रंथालयें, प्रकाशक, इत्यादींना हें नियतकालिक मोफत पाठविण्यांत येणार आहे. मराठीच्या चढत्या-वाढत्या संसाराचें प्रतिबिंब दरमहा दाखविण्याचा हा उपक्रम प्रथमच होत असून श्री. ढवळे यांनी दाखविलेल्या ह्या व्यावसायिक धारीष्टाबद्दल त्यांचें अभिनंदन करावला हवें.

ह्या पत्रकांत सुधारणा करावयास अवसर असून श्री. ढवळे अनुभवानुरूप व शक्त्यनुरूप करतीलच. कोणता लेखक आजकाल लोकप्रिय होत आहे, ललित त्याचप्रमाणें ललितेतर वाङ्मयापैकीं कोणकोणते ग्रंथ किती प्रमाणांत वाचले जात आहेत, ह्याचा तक्ता देण्याची योजना करतां येईल का तें श्री. ढवळे यांनी पाहावें. हेरॉल्ड ट्रिब्यून ह्या वृत्तपत्राला दर रविवारीं ग्रंथपरीक्षणाची पुरवणी जोडण्यांत येते. त्या पुरवणींत What America is Reading असा एक तक्ता असतो. गिऱ्हाइकांच्या ज्याच्यावर उड्या पडल्या अशा पहिल्या सहा ग्रंथांचीं नांवें प्रमुख शहरांतील ठळकठळक ग्रंथविक्रेत्यांकडून मागवून-तक्ता तयार करण्यांत आलेला असतो. मराठी ग्रंथप्रकाशनाच्या योगक्षेमाचें हें किंवा अशा-सारखीं इतर कांही गमकें ह्या 'मराठीचिये नगरीं'त आल्यास त्याची उपयुक्तता खासच वाढेल. श्री. ढवळे यांना सर्व सुयश चिंतितों.

* * *

## धन्यवाद

(१) मराठी नियतकालिकांच्या क्षेत्रांत कांही समीकरणें ठरून गेलीं आहेत. काव्यरत्नावली म्हणजे फडणीस; किंवा फडणीस म्हणजे काव्यरत्नावली. ह्याच पद्धतीवर मासिक मनोरंजन, विविधज्ञानविस्तार, केसरी यांचे बाबतींत मित्र, मोरमकर आणि टिळक-केळकर हीं नावें होत. या तपस्व्यांच्या मालिकेंतील महत्वाचा उल्लेख म्हणजे " **बालसन्मित्र मिसाळ** " हा होय. श्री. मिसाळ यांचा षष्ट्यब्दपूर्तिसमारंभ साजरा व्हावा हें अत्यंत औचित्यपूर्ण आहे. बालवाचकांच्या मनोविकासासाठीं गेलीं ४०।४२ वर्षें त्यांनी आडबाजूच्या ठिकाणीं, अनेक दुर्धर आपत्तींना तोंड देऊन जी मनोभावें वाङ्मयतपश्चर्या केली आहे तिचा कृतज्ञतापूर्वक गौरव करणें महाराष्ट्रीयांचे पवित्र कर्तव्य आहे. श्री. मिसाळ यांना दीर्घायुरारोग्य आणि उदंड यशोलाभ आम्ही चिंतितों.

(२) **कर्मवीर महर्षि कर्वे** ह्यांचे वयास ता. १८ एप्रिल रोजीं ९० वर्षें पुरीं झालीं. त्यांच्या ९१ व्या वर्षप्रवेशदिनाला सर्व मराठी मुलुखांत गुणसंकीर्तनाचा महोत्सव साजरा झाला. हिंदू महिलांचें जीवन ज्या अनेक रूढीच्या शृंखलानी जखडलें होतें त्या तोडून त्यांची मुक्तता करणाऱ्या ह्या कर्मवीराच्या कामगिरीबद्दल He saw his goal, he walked, he persisted, he achieved... In doing this he has served India, he has served Asia; he has served Humanity असे उद्गार F. J. Gould ह्यांनी काढले आहेत ते निर्विवाद यथार्थ आहेत. विद्यार्थीदशेंत मराठी सहावीच्या परीक्षेसाठीं त्यांनी मुरूड ते सातारा ही ११० मैलांची दौड पायीं मारिली होती. तो प्रवास अंगिकारून पार पाडण्यांत त्यांच्या ज्या वृत्ति प्रगट झाल्या त्याच वृत्तीने ते आजतागायत

आपला ध्येयपथ आक्रमीत आले आहेत. त्या पहिल्या प्रवासांतील मैलांची ११० ही संख्या त्यांच्या आयुष्याच्या वाटचालींत वर्षांनी पुरी होण्याचे आरोग्यपूर्ण भाग्य त्यांना लाभो.

* * *

## शोकसमाचार

ह्या तिमाहींत अनेक नामवंत वाङ्मयोपासक कालवश झाले, हें मराठीचें मोठेंच दुर्दैव होय.

**( १ ) सांगलीचे राजकवि साधुदास** उर्फ गोपाळ गोविंद मुजुमदार ह्यांना कॅन्सरच्या विकाराने दि. ६ एप्रिल १९४८ रोजीं देवाज्ञा झाली. दि. १७ फेब्रुवारी १८८४ हा त्यांचा जन्मदिन; म्हणजे मरणसमयीं त्यांचें वयास चौसष्ट वर्षें पुरीं झालीं होती. वनविहार, रणविहार व गृहाविहार हीं त्यांचीं श्रीरामायण महाकाव्यांतर्गत तीन खंडकाव्यें प्रकाशित असून चौथें 'पुरविहार' अपुरें अतएव अप्रकाशित आहे. दोन निर्माल्यसंग्रह, दोन कृष्णालहरी व महायुद्धाचा पोवाडा ही त्यांची स्फुट काव्यरचना होय. 'राजसेवा' हें त्यांचें नाटक अल्पायुषी ठरलें. पेशवाईच्या पडत्या काळावर एक कादंबरीमाला गुंफण्याचा त्यांचा संकल्प होता. त्यापैकीं पौर्णिमा, वद्य प्रतिपदा-पूर्वरात्र व उत्तररात्र अशा तीन कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. 'मराठीची सजावट' ग्रंथाचे दोन भाग असून ते अभ्यसनीय आहेत. बुद्धिबल-क्रीडापटु म्हणून त्यांची ख्याति होती. दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें तिसरें अधिवेशन कऱ्हाड येथे भरलें होतें, त्याचें अध्यक्षपद साधुदासांनी भूपविलें होतें. खुद्द सांगलीस भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे ते स्वागताध्यक्ष होते.

साधुदासांच्या मनाची मूस महाकवीची होती व त्या मुशींतून महाराष्ट्रीय साधुसंतां-प्रमाणें भक्तिभावाचे पाझर अखंड वाहात होते. संस्कृत महाकवींच्या पंक्तीला बसण्यासारखी त्यांची प्रतिभा होती. त्यांच्या ठायीं भाषाप्रभुत्व अप्रतीम असल्यामुळे कसलेंहि खस्याळ-नाठाळ वृत्त लीलया वळविण्याची त्यांच्या लेखणींत जशी शक्ति होती तशीच रचनेची प्रौढी व प्रासादिकताहि त्यांना साध्य होती. इतकें असूनहि त्यांच्या वृत्तींतील शालीनता स्पृहणीय असे. ते लिहितात

> कोणी कंठमणी मनोहर कवि श्रीशारदांगावरी
> कोणी हार तिचे, कुणी सुवसनें, कोणी शिरोभूपणें
> त्यांना कौतुक हें यथार्थ गमतें, बाजूस शोभेविणें
> आनंदें असतो तिच्या चिमुकल्या मी गालबोटापरी

**( २ ) श्री. कृष्णाजी गणेश उर्फ काकासाहेब लिमये**— [ जन्मदिन १५ ऑगस्ट १८९२, मृत्यु ३० एप्रिल १९४८ ] भारतसेवक समाजाचे आजीव सदस्य व ज्ञानप्रकाशचे संपादक ह्या नात्याने महाराष्ट्रास विश्रुत असलेले काकासाहेब लिमये यांचें निधन ही दुसरी शोकप्रद घटना. वृत्तपत्रव्यवसाय हा धंदा नसून धर्म आहे अशी ध्येयवादी घोषणा मराठी पत्रकार परिषदेच्या अध्यक्षपदावरून करणारे काकासाहेब स्वतः त्या बाण्याचे मूर्तिमंत उदाहरण होत. निरलस, मनमिळाऊ, चतुरस्र, पाठीराखा असे त्यांचें वर्णन करतां येईल. स्वभावांत गोडवा असल्यामुळें कुणालाहि ते हवेहवेसे वाटत. अनेक सामाजिक कार्यांत ते मनोभावें पुढाकार घेत असत. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या

कार्याध्यक्ष पदावर त्यांची जी निवड झाली होती ती त्यांच्या ह्या गुणसमुच्चयाची निदर्शक होती. कुणालाहि प्रेमळ व खात्रीचा आधार वाटावा अशी त्यांची सहृदयता असल्यामुळें त्यांच्या निधनानें, अनेक संस्थांप्रमाणेंच, परिषदेचीहि मोठी हानी झाली आहे.

**( ३ ) श्री. पांडुरंग गोपाळ रानडे—**

नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्त्या; ह्या खळबळ उडवून देणाऱ्या इतिहासग्रंथानें एकाएकी प्रसिद्धीस आलेले हे इतिहासाभ्यासी लेखक ता. १४ मे १९४८ रोजीं बेळगाव येथे रक्तदाबाचे विकारानें कालवश झाले. कै. राजे लक्ष्मणराव भोसले (नागपूरकर) यांचें चरित्र श्री. रानडे यांनी लिहिलेलें असून, त्यांत तत्कालीन महाराष्ट्रांतील अनेक चळवळींची समालोचना, शिकारींचीं वर्णनें, चित्रकाव्यें वगैरेनीं तें सजविलेलें पाहून रा. रानडे ह्यांच्या साहित्यगुणांची साक्ष मिळते. त्यांच्या अनेक लौकिक व्याप-आटोपांत आयुर्वेदाच्या प्रसाराचाहि अंतर्भाव असे.

**( ४ ) सौ. वत्सलाबाई घाटे—**

अलीकडे सौ. वत्सलाबाईंची प्रकृति रक्तादाबाच्या विकारामुळे बरीच ढासळली होती. तथापि त्यांच्या निधनाची शोचनीय घटी इतक्या समीप आली असेल, अशी कल्पना नव्हती. आमचे मित्र, रविकिरणमंडळाचे सदस्य, प्रथितयश कवि, शिक्षणखात्यांतील उच्चपदस्थ अधिकारी श्री. विठ्ठलराव घाटे यांच्या त्या पत्नी होत. विद्यार्जनांत बी. ए., बी. टी., झाल्यानंतर त्या येथील हुजुरपागा हायस्कूलमध्यें व नंतर अहमदनगर येथील मुलींच्या हायस्कूलमध्ये शिक्षिका होत्या. म. सा. परिषदेच्या त्या तहाहयात सदस्य होत्या. माधवराव पटवर्धन साहित्य मंदिरासाठी निधि उभारण्याच्या कामीं त्यांचें पुष्कळच सहाय्य झालें आहे. 'बालबोधमेवा' मासिकाच्या त्या कांहीं काळ सहसंपादिका होत्या. सेवानिवृत्तीनंतरच्या स्वास्थ्यांत प्रगतिप्रियता, सौहार्द व कळकळ या त्यांच्या गुणांचा सार्वजनिक कार्यांत—विशेषतः महिलांच्या उन्नतिविषयक कार्यांत लाभ घडावयाचा; पण त्यांची प्रकृति उत्तरोत्तर ढासळतच गेली आणि अखेर ( दि. २३ मे १९४८ रोजीं ) त्या अकालींच कालवश झाल्या ही दुर्धर आपत्ति होय.

**( ५ ) प्रा. चिंतामण नीलकंठ जोशी**

उस्मानिया विद्यापीठाचे मराठीचे माजी प्राध्यापक चिं. नी. जोशी हे दि. १६ जून रोजीं कॅन्सरच्या विकारानें वयाच्या ६८ व्या वर्षी दिवंगत झाले. उस्मानिया विद्यापीठ १९१९ मध्यें स्थापन झाल्यापासून ते तिथे मराठी व संस्कृतचे प्राध्यापक म्हणून काम करूं लागले. मराठीला त्या विद्यापीठांत जी कांहीं प्रतिष्ठा लाभली आहे तिच्या श्रेयाचा बराचसा वाटा प्रा. जोशी यांच्याकडे जातो. मराठवाड्यांतील हस्तलिखितांचें परिश्रमपूर्वक संशोधन करून त्यांनी त्यासंबंधी उद्बोधक लेखन केलें आहे. 'मराठवाड्यांतील अर्वाचीन वाङ्मयाचा इतिहास' हा त्यांचा ग्रंथ प्रकाशित असून, संतकवि श्रीधर याचे चरित्रावर ते गेली पांच सहा वर्षे काम करीत होते.

मराठवाड्यांतील ह्या निष्ठावंत साहित्यिकाच्या निधनानें फार मोठी हानि झाली आहे

* * *

## रावबहादूर दादोबा पांडुरंग[1] : ले०—प्रा. गं. बा. सरदार

चतुरस्र संशोधक व चिकित्सक संपादक म्हणून श्री. अ. का. प्रियोळकर हे मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना पुष्कळच परिचित आहेत. दमयंतीस्वयंवर, आदिग्रंथांतील नामदेव, मराठी व्याकरणाची कुलकथा, गुंजीकरांचा लेखसंग्रह, खिस्ताचें वधस्तंभारोहण इत्यादि ग्रंथांच्या वा लेखांच्या निमित्तानें त्यांनीं संशोधनाची आपली एक स्वतंत्र पद्धती बसविली आहे. 'रावबहादूर दादोबा पांडुरंग' या त्यांच्या नव्या ग्रंथांत ह्या पद्धतीचें अगदीं परिणत स्वरूप आपणांस पहावयास मिळतें. अव्वल इंग्रजींत 'मराठी व्याकरणाचे पाणिनी' म्हणून दादोबा पांडुरंग प्रथम प्रसिद्धीस आले. पाश्चात्य धर्तीवर इंग्रजी शिक्षण घेतलेल्या महाराष्ट्रांतील पहिल्या पिढींत आपल्या आधुनिक समाजजीवनाचा स्वतंत्रपणें विचार करणारे जे कांहीं चार दोन पंडित निर्माण झाले, त्यांत दादोबा पांडुरंग यांची प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. धार्मिक, सामाजिक, वाङ्मयविषयक, शैक्षणिक वगैरे निरनिराळ्या क्षेत्रांतील त्या काळच्या प्रत्येक चळवळीशीं त्यांचा थोडाबहुत संबंध आला होता. वयाची पन्नाशी उलटल्यावर इ. स. १८६८ त त्यांनीं आत्मचरित्र लिहावयास घेतलें. केव्हांतरी जसें सुचेल तसें ते लिहीत गेले. अखेरपर्यंत लिहिण्याचें काम चालूच होतें. इ. स. १८८२ त अंतकालच्या आजारीपणामुळें त्यांत खंड पडला; व शेवटीं आत्मचरित्र अर्धवटच राहीलें. त्यांत दादोबांच्या पूर्वायुष्याची म्हणजे इ. स. १८४७ पर्यंतचीच हकीगत आलेली आहे. इ. स. १९१५ सालच्या महाराष्ट्र साहित्य संमेलनांत कै. पांगारकर यांनीं या ग्रंथाकडे लोकांचें प्रथम लक्ष वेधलें. पुढें विविधज्ञानविस्तारांत हें आत्मचरित्र प्रसिद्ध झालें. प्रस्तुत ग्रंथाच्या पूर्वार्धांत श्री. प्रियोळकर यांनीं त्या समग्र हस्तलिखिताचें चिकित्सक दृष्टीनें सटीप संपादन केलें आहे; आणि उत्तरार्धांत अपुरें राहिलेलें हें चरित्र स्वतः परिश्रमपूर्वक माहिती जमा करून पुरें केलें आहे. दादोबांचा वैयक्तिक जीवनक्रम समजून घेण्यास तर या पुस्तकाची मदत होईलच; पण त्यापेक्षांही एकोणिसाव्या शतकांतील आपल्या सामाजिक इतिहासाचें परिशीलन करणारास एक अमोलिक साधनग्रंथ म्हणून याचा पदोपदीं उपयोग झाल्याशिवाय राहणार नाहीं.

अव्वल इंग्रजींतील महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासाचा अभ्यास अजून नीट व्हावयाचा आहे. तो काळ अत्यंत महत्त्वाच्या घडामोडींचा असून तेव्हांपासून महाराष्ट्राचा कायापालट कसकसा होत गेला हें पाहतांना त्याची फार सूक्ष्मतेनें छाननी केली पाहिजे. इतक्या विविध प्रवृत्तींचीं बीजें त्या काळाच्या भूमींत रुजलेलीं आहेत. पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं नेमक्या याच काळाबद्दल जीं साधनें आज अभ्यासकांना उपलब्ध आहेत तीं तुटपुंजीं तर आहेतच; पण तींही दिवसानुदिवस दुर्मिळ होत चाललीं आहेत; इतकेंच नव्हे तर त्यांतील बरीचशीं आजिबात नष्ट होण्याच्या पंथाला लागलीं आहेत. उदाहरणार्थ, ज्या जुन्या मराठी नियतकालिकांतून, खासगी डायऱ्या व पत्रव्यवहार यांतून, आणि सरकारी दप्तरांतून माहितीचे कण कण धुंडाळीत बसावयाचे ते सारे कागदपत्र आमच्या अनास्थेमुळें व औदासीन्यामुळें कसरी- च्या आहारीं जात आहेत.

[1] रावबहादूर दादोबा पांडुरंग—आत्मचरित्र-चरित्र—संपादक व लेखक. अ. का. प्रियोळकर, प्रकाशक— के. भि. ढवळे, मुंबई. मूल्य बारा रुपये.

वरील सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या, म्हणजे असें म्हणावे लागतें कीं उणेंपुरें एक शतकही लोटलें नाहीं तोंच हा काळ जुन्या इतिहासांत जमा झाल्यासारखा आहे. संशोधकाच्या दृष्टीनें त्या काळाचें चित्र जिवंतपणानें पुन्हां उभें करणें दुर्घट आहे. इ. स. १८८५ त राष्ट्रसभा स्थापन झाली. इ. स. १८८७ त सामाजिक परिषद् अस्तित्वांत आली. त्याच सुमारास आपल्या सार्वजनीक जीवनाला अखिल भारतीय स्वरूप प्राप्त झालें. इंग्रजी वृत्तपत्रें व इतर प्रसिद्धिसाधनें पुरेशीं उपलब्ध झालीं. हिंदुस्थानचें सर्वच जीवन उत्तरोत्तर स्पष्ट व व्यक्त अशा स्वरूपांत जसें वडत गेलें तसेंच तें वृत्तपत्रांत प्रतिबिंबितही झालें. मात्र इ. स. १८८५ पूर्वीचा काळ अजूनही पुष्कळसा अज्ञातच आहे. त्यामुळें प्रियोळकरांच्या या ग्रंथाला विशेष महत्त्व आहे. आत्मचरित्राच्या विभागांत त्यांनीं दिलेल्या तळटीपा म्हणजे त्या अज्ञात व अंधाऱ्या कालखंडांत प्रवेश करण्यासाठीं जागोजाग बांधलेलीं टेहळणीचीं ठाणींच होत.

आतां ग्रंथाच्या प्रत्यक्ष स्वरूपाकडे वळूं. या ग्रंथांतील आत्मचरित्र व चरित्र या दोन्ही भागांचा सांधा अगदीं बेमालूम जोडला गेला आहे. श्री. प्रियोळकरांचें हें यश निःसंशय अभिनंदनीय आहे. नाहींतर आत्मचरित्र वाचतांना वाचकांच्या मनावर जे संस्कार होतात त्यांना विरोधी असें वातावरण चरित्रभागांत निर्माण होऊन एकप्रकारचा विसंवाद उत्पन्न होण्याचा संभव होता.

आत्मचरित्र व चरित्र यांच्यांत जी सुसंबद्धता व एकप्रवाहित्व साधलें आहे त्याचें कारणही उघड आहे. दादोबांच्या जीवनांत व आत्मनिवेदनांत संयमपणा, नेमस्तपणा, बौद्धिक समतोलपणा व कलहविमुखता इत्यादि स्वभावविशेष आढळतात. त्यांच्या या साऱ्या मूलभूत प्रकृतीशीं श्री. प्रियोळकर समरस झालेले आहेत. चरित्रनायकाशीं असा आंतरिक समरसपणा साधूनच त्यांनीं पुढच्या चरित्राची पुरवणी लिहिली आहे. त्यामुळें आरंभापासून अखेरपर्यंत या ग्रंथांत एकजिनसीपणा कायम राहिला आहे.

दादोबाविषयीं प्रियोळकर एके ठिकाणीं म्हणतात" दादोबा हे हॅम्लेटप्रमाणें अतिविचारी होते. विचारांना आचाराचें स्वरूप झटकन कसें द्यावें हें त्यांना फारसें साधत नव्हतें. " हा त्यांचा प्रकृतिधर्म झाला. पण तामाजिक घडामोडीच्या ( पृ. २४३ ) दृष्टीनें त्याचें मूल्यमापन करावयास हवे. दादोबांचा काळ हा तर संक्रमणाचा व संघर्षाचा होता. मग त्यांच्या कलहविमुखतेच उलगडा कसा होणार? यासाठीं तत्कालीन घडामोडींचा आपण जरा परामर्श घेऊं. परमहंससभेशी दादोबांचा घनिष्ठ संबंध होता. ही संस्था ख्रिस्ती होती यांत शंकाच नाहीं. पण या ख्रिस्ती वळणांत स्वजनद्रोहाची भावना मुळींच नव्हती; उलट त्यांत स्वजनोद्धाराची उत्कट व आत्यंतिक तळमळ होती. या सुधारकांना 'कुलहीन, राष्ट्रहीन, समाजहीन' व' कारकुनी पेशाचे' मवाळ लोक असा अहेर नंतरच्या काळांत इतिहाससंशोधक राजवाडे यांनीं केला खरा; पण वस्तुतः हे लोक राष्ट्रीय व सामाजिक पुनरुत्थानासाठींच नवीं ध्येयें व मूल्यें आत्मसात् करण्याची पराकाष्ठा करीत होते. या सुधारणावादाच्या आद्यप्रवर्तकांपैकीं दादोबा एक होते. परमहंससभेचे ते सूत्रधार व आधारस्तंभ होते. पण या सभेच्या जहालपणाला ते स्वतःच पुष्कळदां बुजत, व सारें संचालन दुरून करीत. त्यांचे धाकटे बंधु आत्माराम पांडुरंग यांनी मात्र हा द्विधाभाव न ठेवतां सभेच्या कार्याशीं पूर्ण तादात्म्य राखलें होतें. दादोबांच्या या 'अतिविचारी' व सावधगिरीच्या वृत्तीचें विश्लेषण करून आत्माराम पांडुरंग, बाबा पद्मनजी, जोतीराव फुले

यांच्यासारख्या क्रियाशील व बेडर वृत्तीच्या लोकांहून त्यांचा वेगळेपणा दाखविणें चरित्र-लेखनांतील पूर्णतेच्या व वस्तुनिष्ठ चिकित्सेच्या दृष्टीनें आवश्यक होतें. पण दादोबांच्या वृत्तीशीं समरस होता होता प्रियोळकरांनीं अखेर संशोधकाची तटस्थता सोडली, असें म्हट-ल्याशिवाय गत्यंतर नाहीं. परमहंससभेच्या बैठकींसंबंधी दादोबांची वर्तणूक व नगरच्या लोकांच्या निःशस्त्रीकरणाचें कार्य या दोन्ही बाबतींत श्री. प्रियोळकरानीं केलेलें दादोबांचें समर्थन वाचलें म्हणजे वरील विधानाची सहज सत्यता पटेल. (पृ. २५५,२९७).

आत्मचरित्राच्या व चरित्राच्या द्वारें दादोबांच्या व्यक्तित्वाचें दर्शन घडविणें हा प्रस्तुत ग्रंथाचा उद्देश आहे; व तो बहुतांशीं सफळ झाला आहे. चरित्रनायकाचें जें चित्र रेखाटलें गेलें आहे तेंही अभ्यासकांना मार्गदर्शक होणारें आहे. पण व्यक्तित्वाला आकार देण्याच्या या कार्याला स्वाभाविकपणेंच कांहीं मर्यादा पडल्या आहेत. मात्र या मर्यादांचा उगम मूळ आत्मचरित्रांतच आहे. त्यामुळें त्याच सुरांत रचलेल्या पुढील चरित्रांतही त्या आढळल्या तर कांहीं नवल नाहीं. ह्या आत्मचरित्रांत भावनेची उत्कटता कुठेंच प्रत्ययाला येत नाहीं. आंतरजीवनांतील विचारमंथन व बाह्यजीवनांतील विरोधी प्रवाह यांच्या गाढ व उठावदार रंगांनीं तत्कालीन जीवनाचें मूर्तिमंत चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभें कर-ण्याचें सामर्थ्य या आत्मचरित्रांत नाहीं. वास्तविक पाहतां दादोबांच्या व्यक्तित्वांतच या सामर्थ्याची वाण आहे मग प्रांजळ आत्मचरित्रांत तें कुठून उतरणार ? हें वैगुण्य लक्षांत येण्यासाठीं दादोबांचे समकालीन बाबा पदमनजी यांचें 'अरुणोदय' नामक आत्मचरित्र पाहण्यासारखें आहे. पदमनजींच्या लेखनशैलींतील जिव्हाळा दादोबांच्या भाषेंत नाहीं. दादोबांचा जीवनक्रम म्हणजे सुख्या गद्य अनुभवांची संहिता वाटते, तर पदमनजींचा जीवनक्रम म्हणजे एक शोध आहे, साधना आहे असें दिसतें. आत्मचरित्राच्या रुळावरच श्री. प्रियोळकरांच्या चरित्राचीही गाडी गेली आहे. जीवनांतील भिन्नभिन्न उलटसुलट प्रवाहांच्या भोवऱ्यांत चारित्रनायकाच्या व्यक्तित्याची घडण कसकशी होत गेली तें न दाखवितां त्या प्रवाहांच्या व भोवऱ्याच्या बाहेर स्वतंत्रपणें त्या व्यक्तित्वाचें श्री. प्रियोळ-करांनीं मोजमाप केलें आहे.

दादोबांच्या सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक व वाङ्मयीन कार्याचें मूल्यमापन कर-तांना जांभेकर, लोकहितवादी, आत्माराम पांडुरंग, विष्णुशास्त्री पंडित इत्यादि सम-कालीन व्यक्तींच्या कार्यानें प्रभावी झालेल्या विचारप्रवाहांची दखल घेतली पाहिजे; इत-केंच नव्हे, तर फुले-रानडे प्रभृतींच्या कार्याचा अचूक आढावा घेऊन त्या वेळच्या जागृ-तीचें स्वरूप तुलनात्मक रीतीनें स्पष्ट केलें पाहिजे. लोकहितवादी व फुले यांच्या दृष्टीची झेप व पल्लेदारपणा; आत्माराम पांडुरंग व विष्णुशास्त्री पंडित यांचा बेडरपणा व कार्य-कौशल्य इत्यादि गोष्टी लक्षांत घेतल्यावरच दादोबांच्या व्यक्तित्वाची व विचारांची बैठक जास्त स्पष्टतेनें जाणता येईल. समाजजीवनाच्या सर्व क्षेत्रांत दादोबांनीं कांही ना कांही कार्य केलें आहे; पण त्यांचा पिंड हा क्रियाशील समाजनेत्याचा नाही. ते द्रष्टे तर नाहीतच, पण प्रखर बुद्धिवादीही नाहीत. त्यांची विचारसरणी ही न्या. मू. रानड्यांच्या परंपरानिष्ठ परिवर्तनवादाशी पुष्कळच जुळती आहे. स्वभावधर्मांतहि रानडे व दादोबा पांडुरंग यांच्यांत बरेचसें साम्य दिसून येतें. दोघांचेंहि कार्य मुख्यतः वैचारिक स्वरूपाचें आहे. अर्थात् रानड्यांची भूमिका जास्त व्यापक आहे; दृष्टि अधिक विशाल आहे.

दादोबा पांडुरंग हे पट्टीचे पंडित आहेत, सत्प्रवृत्त विचाराग्रणी आहेत. समाजहिताच्या दृष्टीने जी विचारसरणी त्यांना ग्राह्य वाटली, तिचा त्यांनी प्रामाणिकपणे पुरस्कार केला यांत त्यांचा खरा मोठेपणा आहे. स्वतःच्या मर्यादा ते ओळखून होते. त्यांनी कधीहि द्रष्टेपणाचा दिमाख मिरविला नाही. म्हणूनच त्यांच्या व्यक्तित्वाची कितीहि काटेकोरपणाने चिकित्सा केली, तरी त्यांच्याबद्दलचा आदरभाव नष्ट होण्याचें कारण नाही. त्यांचें सामाजिक व धार्मिक कार्य बव्हंशी सन १८४० ते ५० या दशकापुरतेंच मर्यादित आहे. पण त्यांची मातृभाषेची उपासना मात्र आमरण चालू होती. त्यांच्या भाषाविषयक कामगिरींत कधी खंड पडला नाही. तीच त्यांच्या जीवनाची निष्ठा आहे. तेंच त्यांच्या चरित्राचें अधिष्ठान आहे. पांडित्याच्या या क्षेत्रांतच त्यांच्या स्वतंत्र प्रज्ञेचा प्रकर्षाने प्रभाव पडला आहे. ' मराठी भाषेचे पाणिनी ' हाच त्यांचा गौरव यथोचित आहे.

अशा या महान् भाषापंडिताचा चरित्रपट श्री. प्रियोळकर यांनी अत्यंत परिश्रमपूर्वक संशोधन करून, त्यांतील बारीकसारीक माहिती कसोशीने पारखून घेऊन लोकांपुढे मांडला आहे. या ग्रंथाच्या आरंभी पुण्याचे विद्वान् प्राध्यापक श्री. रा. कृ. लागू यांनी लिहिलेला ' चरित्र व आत्मचरित्र ' या विषयावरील लेख विवेचनात्मक व अभ्यसनीय आहे. या ग्रंथाच्या द्वारे श्री. प्रियोळकरांनी संशोधनकार्याचा एक उत्कृष्ट आदर्शच निर्माण करून ठेवला आहे असें म्हटलें तर त्यांत बिलकुल अतिशयोक्ति होणार नाही.

---

## शौरिसुर (?) तरंगिणी : अधिक माहिती

ह्या नांवाचा लेख ह्या अंकीं देण्यांत आला आहे. त्या काव्याच्या संबंधांत पुढीलप्रमाणें अधिक माहिती मिळाली आहे असें लेखक श्री. करंबेळकर कळवितातः–" काव्याचें संपूर्ण नांव **शौरि सुरत–तरंगिणी** असें आहे; त्यांत एकंदर पांच तरंग असून संपूर्ण श्लोकसंख्या १८०० आहे. काशी व आसपास हें काव्य बरेंच लोकप्रिय आहे. काव्याला ठराविक विषय नाही. कांहीं श्लोक समस्यापूर्तीचे आहेत. इतर अनेक कवींचे श्लोकहि त्यांत मिसळले गेले आहेत. कांहींच्या मतें ह्या काव्याचे अठरा तरंग आहेत. पहिल्या तरंगास 'छन्दोमञ्जरी' असें अभिधान असून त्यांत एकाक्षरी श्री, स्त्री वगैरे छंदापासून पुढें श्लोकरचना केली आहे. ही माहिती श्री. स. ल. कात्रे, क्यूरेटर, सिन्दिया ओरिएण्टल इन्स्टिट्यूट यांच्याकडून आली आहे. शिवाय श्री. कात्रे मूळचे काशीचे असल्यामुळे त्यांना या काव्याची बरीच माहिती आहे. त्यांनी मला प्रत्यक्ष भेटीअंतीं त्यांतील कांही श्लोक म्हणून दाखविले."

* * *

## — परीक्षणें —

**मुसलमानपूर्व महाराष्ट्र–खंड १ ला : राजकीय इतिहास ( इ. स. पू. २०० ते इ. स. १३१८ )** ले० व प्रका० श्री. वा. कृ. भावे, बी. ए., २२६ सदाशिव पेठ, पुणें २. पृ. सं. ३१७ + ४२ मूल्य रु. ३॥८.

शिवकालापासून सुरुवात करून ते पेशवाई अखेरपर्यंत महाराष्ट्राचा इतिहास महाराष्ट्रीय आबालवृद्धांस परिचित झाला आहे. या कालास प्राचीन व अर्वाचीन काळाच्या इतिहासाची जोड देऊन महाराष्ट्रीय इतिहासाचा अभ्यास ऐसपैस रुंदावण्याची जरूरी आहे. कारण शिवकालापासून पेशवाई अखेरपर्यंतच्या कालांत मराठे हे मुसलमानांचे प्रतिपक्षी म्हणून इतिहासांत वावरत व तत्कालीन जीवनाचें प्रतियोगी स्वरूपाचें वर्णन इतिहासांत प्रामुख्याने येतें. इतिहासाभ्यासाचा काल व्यापक केल्याने महाराष्ट्राच्या कर्तृत्वाचे दुसरे पैलूहि लक्षांत येतात व अव्वल मराठेशाहीच्या अभ्यासास सापेक्षता येते. इ. स. १८१८ पासून अव्वल इंग्रजी अंमलांतील ' अर्वाचीन महाराष्ट्र ' चें वर्णन श्री. प्रभाकर पाध्ये यांनी कसेंबसें केलें आहे. प्राचीन कालाकडे कुणा मराठी लेखकाची आजवर नजर गेलेली नव्हती. डॉ. भांडारकर यांनी Early History of the Deccan लिहिलें. त्यासहि आज ५० वर वर्षें होऊन गेलीं. तरी मराठींत श्री. भावे यांचें प्रस्तुतचें परिश्रमपूर्वक लिहिलेलें पहिलेंच पुस्तक आहे. आजवरची ही महत्त्वाची उणीव भरून काढल्याबद्दल इतिहासाचे सामान्य अभ्यासक श्री. भावे यांचे ऋणी आहेत. या पुस्तकाचा 'लोकजीवन' नांवाचा दुसरा खंडहि तत्कालीन समाजजीवनाचे सामान्य वर्णन करणारा या पहिल्या खंडानंतर थोड्याच दिवसांनी प्रसिद्ध झाला आहे. दोन्ही खंडांत मिळून श्री. भावे यांनी इतिहासाचें परिशीलन, धर्मग्रंथांचें अध्ययन, स्थलदर्शन, वृत्तपत्रीय व्यवसायाने हस्तगत झालेलें शीघ्र समालोचन या चार गुणांचा परिपाक असलेलीं सुमारें ७०० पृष्ठें वाचकांस सादर केलीं आहेत.

प्रस्तुतच्या पहिल्या खंडांत डॉ. भांडारकरांच्या उपरोक्त इंग्रजी पुस्तकांत असलेल्या मजकुरापेक्षा साहजिकच कितीतरी अधिक मजकूर आलेला आहे. या प्राचीन कालच्या इतिहासांत शातवाहनापासून प्रारंभ करून चालुक्य, राष्ट्रकूट, दुसरे चालुक्य यांची हकीकत देऊन शेवटीं तीं यादव कालापर्यंत आणून सोडण्याची प्रथा आहे. श्री. भावे यांनी या मुख्य राजकर्त्यांखेरीज गोव्याचें कदंब घराणें, दक्षिण-उत्तर कोंकणचे शिलाहार तसेंच वाकाटक, नल व कलचूरी यांचीहि मिळाली तेवढी माहिती दिली आहे. या खेरीज समकालीन महाराष्ट्राबाहेरचीं राज्यें, भारतीय राजनीति व महाराष्ट्रांतील राज्यपद्धति, यांवर एक एक भाग लिहून अखेरीस पैठण, बदामी, कल्याणी वगैरे प्राचीन महाराष्ट्राच्या राजधान्यांच्या अर्वाचीन स्थितीचें वर्णन प्रवासवर्णनासारखें दिलेलें आहे. ग्रंथकाराचा सनातनी मताकडील झुकता कल, व प्राचीन राजकीय संस्थांबद्दलचा अभिमान हीं वाचकांच्या सहज लक्षांत येणारीं आहेत. शातवाहन कालीन महाराष्ट्रांतील समाजस्थिति हें तिसरें प्रकरण वाचकांनी मुद्दाम वाचण्यासारखें आहे; कारण त्यांत प्राचीन शिलालेखांच्या आधारांनी समाजस्थितीसंबंधीं काढलेलीं अनुमानें ग्रंथकाराच्या अभ्यासकतेची साक्ष देणारीं आहेत.

अशा या प्राचीन कालासंबंधीं शक्यतो सुसंगत माहिती देणाऱ्या ग्रंथांत अभ्यासक वाचकास मतभेदाचीं स्थळें आढळणारच. शक ५५६ तील सत्याश्रय पुलकेशीच्या दानपत्राच्या उल्लेखावर श्री. भावे यांनी केलेलें भाष्य प्रस्तुत लेखकाच्या मतें चुकीचें आहे. या उल्लेखांत 'अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणाम् । नवनवतिसहस्रग्रामभाजाम् त्रयाणाम्।' या श्लोकांतील 'त्रयाणाम् महाराष्ट्रकाणाम्' या शब्दाचा महामहोपाध्याय श्री. काणे यांनी केलेला अर्थ तीन भागांचा महाराष्ट्र–अर्थात् विदर्भ, मुख्य महाराष्ट्र (खानदेश ते सातारा) व कुंतल (कृष्णा नदीकडील प्रदेश) असा दिलेला आहे. श्री. भावे हे 'त्रयाणाम् महाराष्ट्रकाणाम्' या शब्दाचा अर्थ 'तीन महाराष्ट्रांचे' असा करतात व तीन महाराष्ट्र म्हणजे महाराष्ट्र, कर्नाटक व आंध्र होय असें सुचवितात. पैकीं कर्नाटक व आंध्र या देशांस 'महाराष्ट्र' असें गौरवाने म्हटलें आहे असें श्री. भावे यांचें म्हणणें आहे. खेरीज, महाराष्ट्रक म्हणजे महाराष्ट्रांत रहाणारे असा श्री. भावे अर्थ करतात. श्री. भावे यांचें हें भाष्य फारसें कुणासच पटणार नाही. महाराष्ट्रक हें महाराष्ट्र शब्दाचें लघुत्वदर्शक बाल–बालक प्रमाणें रूप आहे. महाराष्ट्रांत राहणारे या अर्थी 'महाराष्ट्रिक' असा शब्द देणें अधिक संभवतें. सबंध महाराष्ट्र म्हणजे खरोखर तीन महाराष्ट्रें आहेत असें लेखकास सुचवावयाचें आहे. तसेंच पहिल्याच पृष्ठावर रामावताराचा काल भारतीय कालापूर्वी एक हजार वर्षें असा ठोकून देऊन तो ४३०० वर्षें जुना असल्याचें श्री. भावे सांगतात; व मत्स्य-मार्कंडेय पुराणांच्या आधाराने राम व सीता यांच्याकरितां गोदावरीचे काठीं नाशिकचे आसपास राम वनवासांत असतां रहात असत असें सुचवितात. दण्डकारण्यांतील पंचवटीच्या नेमक्या स्थानाबद्दल विद्वानांत असलेल्या मतभेदांकडे श्री. भावे दुर्लक्ष करतात. मत्स्यपुराणांत पहिल्या आंध्र राजाचा उल्लेख आहे व हें पुराण शकोत्तरकालीन असल्याचें निश्चित झालें आहे. अर्थात् मत्स्यपुराणाला राम नाशिकजवळ पंचवटींत रहात होता हें मान्य असेल; पण हें पुराणहि रामावतारानंतर निदान दीड दोन हजार वर्षांनी लिहिलें गेलें आहे त्यावर विसंबून हें विधान कसें स्वीकारावयाचें ?

असे मतभेदाचे प्रश्न व सैल विधानें पुस्तकांत अगदीच सापडणार नाहीत असें नाही. पण ग्रंथकर्त्यांने या विषयावर केलेले परिश्रम, या कार्यातील अडचणी व एकंदर विषयाची मांडणी लक्षांत घेतां त्याकडे सहानुभूतिपूर्वक पहाणें क्षम्य ठरेल. 'पेशवेकालीन महाराष्ट्र' लिहून श्री. भावे यांनी केलेली इतिहासाची सेवा प्रस्तुतचा द्विखंडात्मक ग्रंथ लिहून अनुरूपतेने पुढे चालविली आहे याबद्दल त्यांचें अभिनंदन करून हें अल्पसें परीक्षण पुरें करतों.

—प्रा. रा. वि. ओतुरकर.

**सदाशिवराव भाऊ**—(ले० श्री. वि. म. भुस्कुटे, पृ. सं. २६०, मूल्य रु. ४. प्रका० डेक्कन पब्लिशर्स लिमिटेड, २७ बुधवार पेठ पुणें. प्रथमावृत्तीचे हक्क ऐतिहासिक ग्रंथ-प्रकाशन-समिति, बेळगांव यांचे.)

मराठी लेखकांत श्री. भुस्कुटे यांनी आपल्या परिश्रमाने मानाचें स्थान मिळविलें आहे. त्यांनी लिहिलेल्या कार्लमार्क्स, लेनिन व स्टॅलिन या चरित्रग्रंथांचें मराठी वाचकांनी स्वागत केलें आहे. निव्वळ ऐतिहासिक पुरुषाचें त्यांनी लिहिलेलें हें चरित्र बहुधा पहिलेंच असावें. श्री. भुस्कुटे यांच्यासारखा परिश्रमी लेखक इतिहासाच्या क्षेत्रांत उतरल्याबद्दल आम्ही त्यांचें

मनःपूर्वक स्वागत करतां. श्री. भुस्कुटे यांची समाजवादी मनोवृत्ति या चरित्रांतहि डोकावते. श्री. भुस्कुटे प्रस्तावनेंत म्हणतातः—उत्तरेच्या मोहिमेप्रमाणे उत्तरेकडील मोहिमांचें काम वेळींच भाऊसाहेबांकडे दिलें असतें तर पानिपतची मोहिम उद्भवली नसती, ...... मराठेशाहीच्या नेतृत्वाखाली 'अखंड हिंदुस्थान' निर्माण झाला असता. या एकतंत्री सरंजामशाहीतून इतिहासक्रमानुसार जगांतील इतर देशाप्रमाणे हिंदुस्थानांतहि भांडवलशाहीला वाव मिळाला असता व त्यांतूनच हिंदुस्थानला समाजवादी बनविण्याचें काम इतिहासाने केलें असतें' (पृ. २,३) एकूण लेखकाच्या मतें भाऊकडे उत्तरेच्या मोहिमा देण्याचें काम बेटया इतिहासाने केलें नाही, यामुळे बराच घोटाळा झाला ! श्री. भुस्कुटे यांच्या तर्कपद्धतींत बिनचुकपणापेक्षा समाजवादाची तळमळ अधिक दिसते हें त्यांना मान्य करावें लागेल. समाजवादी मनोवृत्तीचें दुसरें उदाहरण लेखकाने पानिपत प्रकरणाची मीमांसा केली आहे तेथे दृष्टीस पडतें. पानिपतानंतर एक दोन महिन्यांत मराठे एकत्र होऊन अब्दालीवर पुन्हा कां चाल करून गेले नाहीत याची पृ. २२७—२२८ वर मीमांसा करतांना श्री. भुस्कुटे म्हणतात—'असें विचारणारांना युद्धशास्त्रच माहीत नाही... ... गिरणीमालकाविरुद्ध कामगारांनी अगदी एकजुटीने कितीहि जोराचा संप केला व तो कांही दिवस हिंमतीने चालविला असला, तरी हा संप एकदा मोडल्यावर मालकांनी ताबडतोब कसलींहि जुलुमाचीं कृत्यें केलीं तरी कामगारांना पुनः लगेच संपावर जाणें शक्य नसतें. मालक-मजुरांच्या साध्या लढ्यांत सुद्धा हा अनुभव येतो. पानिपतचा संग्राम हा हिंदुस्थानांतील दोन प्रचंड लष्करी शक्तींचा सामना होता.' ऐतिहासिक युद्धांतील यशापयशाची मीमांसा करण्यासाठी गिरणीच्या संपाचा दृष्टांत देणारे श्री. भुस्कुटे हे बहुधा पहिलेच लेखक असतील. श्री. भुस्कुटे हे नुसते कलमबहाद्दर नाहीत. आघाडीवरचे कर्मवीर आहेत. त्यांच्या जीवनांतून हा दृष्टान्त त्यांनी इतिहासवाङ्मयांत आणला याचें कौतुक वाटतें. परीक्षणाचे प्रारंभीं श्री. भुस्कुटे यांचें जें आम्ही स्वागत केलें तें अशा रीतीने नव्या दृष्टिकोनाने व दृष्टांतांनी इतिहासवाङ्मय जिवंत व समृद्ध करण्यासाठीच होय.

प्रस्तुतचें सदाशिवराव भाऊ हें पुस्तक श्री. भुस्कुटे यांनी एक विशिष्ट 'केस' तयार करण्यासाठी लिहिलेलें पहिल्या पृष्ठापासून दिसतें. 'भाऊ' चांगला, नानासाहेब वाईट व स्वार्थी. त्याची बायको गोपिकाबाई ही तर त्याच्याहूनहि तशी. भाऊ पानिपतचे युद्धांतून जिवंत सुटला; पण उत्तर पेशवाईतील बारभाईनी स्वतःच्या स्वार्थासाठी त्याला नेस्तनाबूद केलें. हा सर्व ग्रंथाचा सारांश. हें सिद्ध करण्यासाठी अनुकूल तेवढे पुरावे—मग ते दुय्यम अगर तिय्यम दर्जाचे कां असेनात—चरित्रकाराने एकत्र केले. हें चरित्र लिहिण्यास मुख्य आधार रियासतकार सरदेसाई यांच्या ग्रंथाचा घेतला असें लेखक म्हणतात. पण त्याच रियासतींत 'तोतया' विरुद्ध जाणारीं अनेक पत्रें आहेत तीं नेमकी दृष्टीतून लेखकाने कां वगळलीं ? उदाहरणादाखल सरदेसाईकृत मराठी रियासत उत्तर विभाग भाग १ ला पृ. ८५।८६ वर दादासाहेबांचें पत्र दिलें आहे. त्यांत दादासाहेब (राघोबा) म्हणतातः—'तोतया खरा नाही'. खुद्द रियासतकारांचा निष्कर्ष तोतयास विरुद्ध जाणारा आहे. त्यास लेखकाने संधि साधून उत्तरें कां दिलीं नाहीत ? जो लेखक आपल्या विरुद्ध जाणारा पुरावा डावलतो व पूर्वी व्यक्त झालेलीं मतें व विधानें खोडून काढीत नाही त्याचीं विधानें परीक्षणांत खोडून काढण्याचा प्रयत्न करणें हा कालापव्यय आहे. मौज ही की, लेखक सरदेसाई यांच्यासारख्या तज्ज्ञांचाच केवळ आधार म्हणून उपयोग

करीत नाही, तर त्याने श्री. पां. गो. रानडे यांनी लिहिलेल्या 'खून कीं आत्महत्या ?' या प्रसिद्ध ग्रंथाचाहि आधार घेतला आहे. इतकें सांगितल्यावर पुस्तकांतील विधानांवर आणखी भाष्य करण्याची जरूर नाही.

पण या परीक्षणाचे निमित्ताने पूर्वी साहित्यपत्रिकेंत 'खून कीं आत्महत्या' ग्रंथाचें परीक्षण करीत असतां सांगितलें तें पुन्हा सांगतों. भाऊ चांगला ठरो, कीं नानासाहेब स्वार्थी ठरो, नाना फडणवीस स्वामिभक्त ठरो किंवा स्वामिद्रोही ठरो, इतिहासाच्या अभ्यासकास त्याचें कांहींहि वाटणार नाही. अस्सल पत्रें प्रकाशित करून प्रसंगीं आपल्या विरुद्ध जाणारा पुरावाहि प्रामाणिकपणाने प्रसिद्ध करण्यास मराठी संशोधक कचरत नाहीत. या अव्याभिचारी सत्यनिष्ठेने पुरावा ताजव्यांत तोलण्यास व माप पदरांत देण्यास व घेण्यास सर्वांनी तयार असावें. उगाच कुणाच्या शिफारसीने मिंधे बनून जगापुढे येण्याइतके श्री. भुस्कुटे यांनी दुबळे बनूं नये. कारण त्यांच्या अंगांत स्वतःचें असें गौरवास्पद तेज आहे.

—प्रा. रा. वि. ओतुरकर.

**ज्योतिर्विलास** अथवा **रात्रीची दोन घटका मौज** किंवा **अंतरिक्षांतून फेरफटका**—ले० कै. ज्योतिर्विद शं. बा. दीक्षित; नवीन सुधारून वाढविलेली आवृत्ति ६ वी; पृष्ठें ११ + ४ + ३५२; संपा. प्रका. रा. रा. शं. दीक्षित, टिळकवाडी, पुणें २, मूल्य रु ५.

सुप्रसिद्ध ज्योतिर्वेत्ते श्री. शं. बा. दीक्षित यांनी १८९२ सालीं प्रसिद्ध केलेल्या या पुस्तकाचा विषय केवळ शास्त्रीय असतांना सुद्धां, अवघ्या पंचवीस वर्षांत त्याच्या पांच आवृत्ति खपल्या. अलीकडे अनेक वर्षें हें पुस्तक दुर्मीळ झालेलें होते. शुद्ध शास्त्रीय विषयाची मांडणी देखील कादंबरीवजा भाषेत कशी करतां येते याचा आदर्श मूळ पुस्तकाच्या रूपाने उभा राहण्याजोगा असल्यामुळे या पुस्तकाचें पुनर्मुद्रण आवश्यकच होतें. मध्यंतरीच्या काळांत ज्योतिषशास्त्राची प्रगति आणि पसारा एवढा वाढलेला होता, की ५० वर्षांपूर्वीच्या माणसानें तो एक कायापालटच मानावा. अशा स्थितींत जुन्या पुस्तकाचें स्वरूप कायम ठेऊन त्यांत नवीन शास्त्रीय ज्ञानाची भर अशा तोलामोलाने घालावयाची की त्यामुळे पुस्तकाची एकरूपता बिघडूं नये. हें कार्य किती कठीण आहे हें तसा प्रयत्न करणारांनाच उमगण्याजोगे आहे. हें कार्य दीक्षिताचे पौत्र डॉ. कमलाकर रामचंद्र यांनी प्रस्तुत प्रकाशनांत फार चांगल्या रीतीने साधण्याचा प्रयत्न केला असून प्रस्तुत स्वरूपांत पुस्तक प्रसिद्ध केल्याबद्दल उभयतां दीक्षित पुत्र-पौत्रांचें अभिनंदनच केलें पाहिजे.

कै. दीक्षितांच्या मूळ पुस्तकांतला विषय मुख्यत्वेंकरून सूर्य आणि त्याची ग्रहमाला यांची माहिती देण्यापुरताच मर्यादित होता. त्यानंतर आतां उपलब्ध झालेली माहिती ध्यानांत घेऊन प्रस्तुत पुस्तकांत प्रकाशकिरण, सूर्याचें अंतरंग आणि बहिरंग, ताऱ्यांचा विस्तार आणि त्यांची घडण, निरानिराळ्या प्रकारचे तेजोमेघ, आपली आणि आपल्यासारख्याच इतर आकाशगंगा, इत्यादिकांविषयी थोडक्यांत माहिती दिली आहे. जीवसृष्टीच्या मर्यादांचाहि थोडक्यांत ऊहापोह केलेला आहे. मूळ विषय पुष्कळच मोठा, मराठी प्रकाशन मर्यादित स्वरूपाचें आणि मराठींतून शास्त्रीय लेखन करतांना निश्चित परिभाषेची अडचण, यामुळे

क्वचित् स्थळीं केवळ मराठींतून शिकलेल्या विद्यार्थ्याला विषयाचा त्रोटकपणा भासण्याजोगा असला तरी तूर्त तो अपरिहार्यच म्हटला पाहिजे.

मराठी भाषेत असला मनोरंजक स्वतंत्र ग्रंथ नसल्याने सर्वसामान्य वाचकांच्या आकांक्षा खात्रीने पुऱ्या होतील. लोकशिक्षणाचा प्रयत्न करणारा हा ग्रंथ अवश्य वाचावा अशी शिफारस आहे.

—प्रा. मो. ल. चंद्रात्रेय.

**सुखसंवाद**—लघुनिबंधसंग्रह—ले० श्री. वा. पु. दामले एम्. ए. एल्एल्. बी. बुलढाणें. प्रका. चित्रशाळा प्रेस, पुणें. मूल्य अडीच रु.

समाजाच्या सुसंकृत व अभिजात अभिरुचीचें द्योतक म्हणजे आजच्या मराठी वाङ्मयांत भर पडत असलेले लघुनिबंध होत. १९२५ मध्ये प्रा. ना. सी. फडके यांनी रूढ केलेला हा आत्मप्रकटीकरणाचा छोटा पण कलात्मक प्रकार आज संपन्न होत असल्याच्या खुणा प्रतिवर्षी प्रसिद्ध होत असलेल्या लघुनिबंधसंग्रहांवरून दिसून येतील. यंदा श्री. वामन पुरुषोत्तम दामले यांचा लघुनिबंधसंग्रह 'सुखसंवाद' या सार्थ अभिधानाने प्रसिद्ध झाला आहे. लघुनिबंधकार हा ' बहुश्रुत ' व ' मर्मज्ञ ' हवा ही अपेक्षा श्री. दामले आपल्या लघुनिबंधांतून पूर्ण करतात. साहित्य, इतिहास, अध्यात्म, अर्थशास्त्र आणि विज्ञानाच्या विविध शाखा यांचा उपयोग लेखकाने अत्यंत मार्मिकतेने केलेला आहे. मित्राच्या भूमिकेवर उभें राहून गप्पांच्या भरांत एकाद्या तत्त्वाचें विवेचन इतक्या नकळत व सफाईने केलेलें आहे की हा लघुनिबंधकार फार जवळून आपण बघत आहोंत असा भास वाचकांना व्हावा. ' अर्थशास्त्राच्या मर्यादा, अपयशाचें यशोगीत, भीतीच्या रम्य कथा, साधुसंताच्या उपरति, वादविवादांतील मौजा, स्तुतीचें इंद्रधनुष्य, नेत्रांची रमणीयता हे लघुनिबंध मराठी लघुनिबंधाचा दर्जा किती उंच झाला आहे याची जाणीव करून देतील.

भाषाशैलीच्या बाबतींत मात्र श्री. दामले याची भाषा कोणतेंहि एक उत्कट वैशिष्ट्य दाखवीत नाही. फडके यांच्या भाषेसारखी ती सहजसुंदर नाही, खांडेकरांच्या भाषेप्रमाणें आलंकारिक नाही किंवा माटे यांच्या भाषेसारखी ओजस्वी व प्रादेशिक स्वरूपाचीहि नाही. भाषेचें स्वरूप आकर्षक नसलें तरी त्या भाषेंतून प्रकट होणारे विचार मात्र मौलिक—स्वतंत्र—आहेत आणि त्या विचारांचें वळण माटे-परंपरेंतील म्हणजे अभिजात व शुद्ध संस्कृतीचें निदर्शक आहे. गुजगोष्टींचा वेष जरी या सुखसंवादांनी घेतलेला असला तरी त्या संवादांतून प्रकट होणारा लेखकाचा जीवनविषयक दृष्टिकोन खेळाडू वृत्तीचा आहे. या दृष्टिकोनामुळेच हें पुस्तक वाचनीय व संग्राह्य झालें आहे. भाषेच्या लालित्याची फारशी उपकारक जोड नसूनहि, रचनाकौशल्य, आरंभ व अखेरचे टप्पे, मोकळेपणाने मारलेल्या गप्पा व त्यांतून हंसत खेळत वा नर्मविनोदाने केलेली विचारांची गुंफण या गुणांमुळे सुप्रसिद्ध निबंधविवेचक वुड्हाऊस यांच्या पुढील विधनाची आठवण होते—By the magic of his art he will proceed to spin round it (subject) so radiant a web of thought and fancy, of humour and pathos, that the thing will seem a miracle.—आणि याचमुळे खरोखर जीवनांतील सुखदुःखाच्या प्रसंगावर आधारलेले हे ' सुखसंवाद ' रम्य ठरल्याशिवाय रहाणार नाहीत.

—प्रा. म. वि. फाटक.

**"सुबोधन आणि धर्मचिंतन"**—[ श्री. वामन अनंत ऊर्फ मामासाहेब गरुड यांच्या प्रार्थनासमाज मंदिरांतून व इतरत्र झालेल्या प्रवचनांचा संग्रह. संपा० श्री. चिं. ग. कर्वे. प्रका० आर्यसंस्कृति मुद्रणालय, पुणें २. मूल्य दीड रु.]

कै. न्या. मू. रानडे, कै. डॉ. भांडारकर वगैरे नामवंत, विद्वान् प्रार्थनासमाजी-यांचीं धर्मपर व्याख्यानें निर्विकार मनाने वाचणारांस सन्मार्गदर्शक व परिणामकारक वाटतात. याचें कारण त्या थोर गृहस्थांच्या विद्वत्तेपेक्षा त्यांची धर्मनिष्ठा, अंतःकरणाची तळमळ व चारित्र्य हीं होत. प्रस्तुत पुस्तकांत वरील विद्वानांची विद्वत्ता कदाचित् दिसणार नाहीं; पण त्यांची तत्त्वनिष्ठा व धर्मप्रेम ठळकपणें दृष्टीस पडतील. पुस्तकाच्या आरंभीं श्री. मामासाहेब गरुडांनी लिहिलेल्या लहानशा आत्मचरित्रावरून त्यांच्या आचरणांत त्यांची तत्त्वनिष्ठा कशी उतरली होती हें स्पष्ट दिसतें, व त्यांच्याविषयीं आदरयुक्त कौतुक वाटतें. हाताने सर्व गृहकृत्यें करून व अत्यंत काटकसरीने राहून द. म. ऐंशी रुपयांच्या पेनशनांतून जी काय शिल्लक राहील ती देश, काल, पात्र पाहून सात्त्विक परोपकारांत खर्च करण्याचा त्यांचा अनेक वर्षांचा क्रम त्यांच्या मित्रमंडळींस विदित आहे. 'जोडोनिया धन उत्तम व्यवहारें। उदास विचारें वेंच करी॥' हा त्यांनी दुसऱ्यांस व्याख्यानद्वारें केलेला उपदेश अक्षरशः पाळला आहे. यालाच म्हणावें " बोले तैसा चाले."

श्री. गरुड यांच्या व्याख्यानांत धर्म, भक्ति, संतसंगति वगैरे धार्मिक व नैतिक विषयांचें विवेचन असलें तरी त्यांची दृष्टि एकांगी नाहीं, किंवा त्यांचें धर्मप्रेम अंध नाही. जागोजागीं व्याख्यानांत त्यांनी सामाजिक दोष, धर्माचरणांतील अशुद्धता निर्भीडपणें निदर्शित केली आहे. परमार्थाबरोबरच नेटका संसार कसा करावा हेंहि ते दाखवितात. उपवास, देवपूजा, चातुर्मास वगैरे विषयांवरील तर्कशुद्ध सटीक विवेचन या दृष्टीने पाहण्यासारखें आहे. प्रार्थनासमाजासंबंधीं जनतेंत उत्पन्न झालेले किंवा केलेले गैरसमज त्यांनी 'प्रार्थनासमाज परका धर्म नव्हे' वगैरे व्याख्यानांतून दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. पुस्तकाची भाषा साधी, सुलभ परंतु अंतःकरणाची कळकळ व्यक्त करणारी व म्हणूनच परिणामकारक अशी आहे. पुस्तकाच्या नांवाप्रमाणे त्यांत तर्कशुद्ध धर्मचिंतन व आबालवृद्धांस उपकारक असें सुबोधन आहे. त्यांनी केलेल्या सुबोधांतील गोष्टी इतक्या नेहमींच्या परिचयांतल्या आहेत की ' अः, त्यांत काय आहे ! या नेहमींच्याच भाकडकथा आहेत; आता हें उपदेशामृत बस करा ! ' असे उद्गार कांहीं असमंजस व अविचारी वाचक काढतील. पण अनुभवी व विचारी वाचक या उपदेशामृताला योग्य मान दिल्यावांचून राहणार नाहीं. अशा पुस्तकांची माझ्या मतें हल्लींच्या **अव्यवस्थित** समाजाला फार जरूर आहे.

—**प्रा. गोपाळ विष्णु तुळपुळे.**

**सनातनीच धर्मबुडवे**—( ले० श्री. ग. रा. परांजपे १२८ बुधवार पेठ, पुणें. प्रका०आर्यसंस्कृति मुद्रणालय, सदाशिव पेठ, पुणें; पृष्ठसंख्या ६८).

पुस्तकाच्या नांवावरून विवेचन वृत्तपत्री थाटाचें असावें असा कोणी तर्क केल्यास तो चुकीचा ठरेल. प्रस्तुत पुस्तकांतील सर्व विवेचन मुद्देसूद, साधार आणि सुबोध असून अत्यंत औचित्यपूर्ण आहे. महाराष्ट्रांत जो सुशिक्षित वर्ग आहे त्यांत धर्माविषयीं परस्परविरुद्ध दोन प्रकारचीं मतें दिसून येतात. धर्माचार आणि धर्मनियम पुरुषबुद्धीला

अगम्य अशा गूढ ज्ञानावर आधारलेले आहेत. अर्थात् ऐहिक लाभहानि पाहून धर्माचारांत फिरवाफिरव करणें अशक्य आहे असें त्या पक्षाचें म्हणणें असतें. 'याच्या उलट धर्मसंस्था उपेक्षणीय, निरुपयोगी, किंबहुना हानिकारक आहे असें दुसरा पक्ष म्हणतो' हे दोन्ही पक्ष आपल्या धर्मग्रंथाकडे चिकित्सक दृष्टीने पहात नाहीत हें शोचनीय होय. पहिल्या पक्षांतील विद्वान् अंधश्रद्धेने धर्मग्रंथाकडे पाहतात. यामुळे धर्मचिकित्सा ते करूं शकत नाहीत. उलट दुसऱ्या पक्षांतील लोक अंध अश्रद्धेमुळे धर्माचें यथार्थ स्वरूप जाणूं शकत नाहीत. अंधश्रद्धा आणि अंध अश्रद्धा हीं दोन्हीं टोकें सोडून धर्म, धर्माचार आणि धार्मिक नियम यांचा बुद्धिवादाच्या निकषावर कसा निर्णय करतां येतो हें या पुस्तकांत चांगल्या प्रकारें विशद केलें आहे.

कोणताहि धर्मग्रंथ सर्वस्वी प्रमाणहि नाही आणि अप्रमाणहि नाही, परमेश्वराने वेद सांगितले हें खोटें आहे, वर्ण-जाति-अस्पृश्यता मनुष्यकृत आहेत इत्यादि लेखकाचीं प्रमेयें वाचतांच आगरकरी युगाची आठवण येते. परंतु लेखकाचें धोरण निवळ मूर्तिभंजनाचें किंवा दंभस्फोटाचें नाही. धर्माविषयीं विकृत कल्पनांची केवळ टर उडवीत न बसतां धर्माचारांची उपपत्ति दाखविण्याचेंहि अत्यंत अवघड पण महत्त्वाचें कामहि लेखकाने केलेलें आहे.

सामाजिक स्थैर्यासाठी पाळावयाच्या नियमांस नीति, यम किंवा दैवी संपत् अशीं नांवें देऊन नीतीच धर्माचा निकष होय असें लेखकाने दाखविलें आहे. स्नान, संध्या, पूजा, वैश्वदेव या नीतीस पोषक असतील तरच धर्म होत; त्यांस स्वतंत्र धर्मपणा नाही हें लेखकाचें प्रतिपाद्य ध्यानांत घेण्यासारखें आहे.

येवढ्याशा लहान पुस्तकांत धर्माच्या सर्व अंगांवर विस्तृत ऊहापोह देणें शक्य नाही हें कोणीहि मान्य करील. परंतु थोडक्यांत या सर्व विषयांचा परामर्श लेखकाने मोठ्या कुशलतेने घेतलेला आहे हें विशेष आहे. वर्ण, जाति, जन्मजात उच्चनीचत्व, विधवा-विवाह, शुद्धीकरण इत्यादि सामाजिक विषयांबरोबरच परमेश्वर, परलोक, पुनर्जन्म, अध्यात्म इत्यादि गूढ विषयावरहि लेखकाने सडेतोड विचार प्रदर्शित केलेले आहेत, हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. "आपल्या तत्त्वज्ञानाप्रमाणें जगदुत्पत्तीपूर्वी ब्रह्म एकटेंच शुद्ध होतें.... ......त्याला असें स्फुरलें कीं आपण बहु होऊंया. या त्याच्या स्वतःच्याच इच्छेनुसार तें बहु झालें...... ही उत्पत्ति दृष्टीपुढे ठेवून विचार केला तर मुक्त झालेला जीवात्मा पुनश्च या जन्ममरण फेऱ्यांत सांपडणारच नाही म्हणून कशावरून ?" असें एखादें विधान लेखकाने वेदान्तशास्त्राकडे विशेष खोल दृष्टीने न पाहतांच केलेलें असलें तरी पुस्तकांतील मुख्य प्रमेयास त्यामुळे बाध येत नाही हें लक्षांत घेतलें पाहिजे. परलोक, परमेश्वर, अध्यात्म इत्यादि गूढ प्रमेयें मान्य केलीं तरच धर्माचारांची सिद्धि करतां येते असें नसून निर्भयपणा, स्वार्थत्याग, लोकसेवा, समानता इत्यादि प्रत्यक्षसिद्ध आणि बुद्धिग्राह्य तत्त्वांच्या आधारावर धर्माचारांची उभारणी बुद्धिवादाच्या आधाराने कशी करतां येते हेंच लेखकाने अनेक विषयांत शिरून दाखविलेलें आहे. पारलौकिक किंवा गूढ कल्पनांचाहि ऐहिक उन्नतीसाठी कशा प्रकारें उपयोग होऊं शकतो हें लेखकाने चांगल्या प्रकारें दाखविलेलें आहे. पुस्तकाच्या नवव्या प्रकरणांत श्री. राजोपाध्ये यांच्या आक्षेपांस दिलेलीं उत्तरें अत्यंत उद्बोधक आहेत. धर्माच्या मूलतत्त्वांकडे पाठ फिरवून आणि केवळ प्रचलित रूढींकडेच लक्ष देऊन धर्मनिर्णय करण्याच्या सनातन्यांच्या प्रथेमुळेच धर्मवृक्षावर

समाजघातक अधर्मांचीं बांडगुळें माजलीं आहेत. या बांडगुळांसच धर्म समजून त्यांचीच जोपासना करण्यामुळे सनातनीच कसे धर्मबुडवे झालेले आहेत हें या पुस्तकावरून चांगलें प्रत्ययास येतें. या बांडगुळांस धर्म समजावें असें आमच्या धर्मग्रंथांत सांगितलेलें नाहीं या सिद्धान्ताचाहि यथायोग्य पुरस्कार लेखकानें केलेला आहे.

आज आपल्या समाजात जे धर्मविषयक मतभेद माजलेले आहेत त्याचें मुख्य कारण सर्वसामान्य सुशिक्षित वर्ग धर्माविषयीं सहजासहजीं कानावर पडलेल्या माहिती-वरूनच आपले धर्मविषयक विचार बनवितो हें होय. ज्या ग्रंथाचें नांव घेऊन सनातनी समाजविघातक रूढींचा अट्टहास धरून बसतात त्या ग्रंथांकडे जनता वळेल तर सनातन्यांचा आधारच काढून घेतल्याप्रमाणें होईल. सनातन्यांचें हें मर्मस्थान लेखकानें या पुस्तकांत चांगलेंच उघडें करून दाखविलेलें आहे. धर्माविषयीं बोलणाऱ्या सर्वांनी हें पुस्तक वाचून पाहिल्यास सनातन्यांची बाजू किती लंगडी आहे हें ध्यानांत येऊन त्याच-बरोबर भारतीय धर्माचार्यांच्या उदात्त आणि सर्वसंग्राहक विशाल धोरणाचा प्रत्यय आल्यावांचून राहणार नाहीं. भारतीय परंपरेचें उज्ज्वल स्वरूप थोडक्यांत पण स्पष्टपणें दाखविणाऱ्या या पुस्तकाचें जनतेकडून योग्य प्रकारें स्वागत होणें अवश्य आहे.

—र. गो. कोकजे.

**'त्रिवेणी संगम'**— ( प्रका० हेमराणी साहित्यकिरण, पुणें २; मूल्य २ रुपये. )

या कथासंग्रहांत रा. बा. बेहेरे, प्र. न. जोशी व मा. वा. पाळंदे यांच्या गोष्टी आहेत. लघुकथेच्या प्रांतांत सध्यां जें 'अराजक' माजलेलें आहे त्याची प्रचीति या ठिकाणींहि येते. श्री. पाळंदे यांची 'रिकामा वर्ग' ही गोष्ट तंत्र आणि आविष्कार या दृष्टीने उल्लेखनीय आहे. श्री. जोशी यांची 'बायका सांगणी' ही भावपूर्ण कथा केवळ त्या कथेच्या लांबीमुळे रसभंगकारक झाली आहे. श्री. बेहेरे यांनी जो संपादकीय मजकूर लिहिला आहे तो त्यांच्या गोष्टीपेक्षा अधिक वाचनीय आहे. या त्रिवेणी संगमाच्या पुढच्या प्रवाहाला जर 'घाट' लाभला तर इष्ट वळणाने तो जाईल यांत मुळीच संशय नाही.

—प्रा. चंद्रकुमार डांगे.

**'जीवनगंगा'** ( कादंबरी )— ( ले० रघुवीर सामंत, प्रका० पारिजात प्रकाशन मुंबई, मूल्य ४॥ रुपये. )

'**जीवनगंगा**' ही रघुवीर सामंतांची 'स्वतंत्र, सामाजिक, मनोविश्लेषणात्मक' कादंबरी. रघुवीर सामंतांनी आतापर्यंत शब्दचित्रें-लघुकथा व कादंबरी या तीनहि क्षेत्रांत चांगलें नांव कमावलें आहे. आणि म्हणूनच 'जीवनगंगा' या त्यांच्या नव्या कादंबरीकडे वाचक एका विशिष्ट अपेक्षेने वळतो. पण दुर्दैवाने वाचकांची ती अपेक्षा रघुवीर सामंतांनी तितकीशी पूर्ण केली नाही असेंच कादंबरी वाचून झाल्यावर म्हणावेसें वाटतें.

डॉ. सुधीर या मुंबईतील यशस्वी डॉक्टराच्या जीवनाची ही कहाणी आहे आणि यांतील बहुतेक कथानक 'जीवनगंगें'त घडलेलें आहे. 'जीवनगंगा' हें डॉक्टर सुधीरच्या हॉस्पिटलचें नांव. कादंबरीचें कथानक एकंदर सहा भागांत विभागलेलें असून तें सांगतांना लेखकाने विलोम पद्धतीचा अवलंब केला आहे. सुरवातीच्या भागांत डॉ. सुधीरांचें वर्णन व 'जीवनगंगे'चें वर्णन करून लेखकाने पहिली समरघटना एका मुलीच्या ॲपेंडिक्सच्या ऑपरेश-

नच्या रूपाने निर्माण केली आहे. नेहमी संथपणे व अत्यंत कौशल्याने ऑपरेशन करणाऱ्या डॉ. सुधीरचे हात ऑपरेशन सुरू होते न होते तोंच थरथर कापूं लागतात. डोळ्यांत पाणी सांचतें व कपाळावर घर्मबिंदू उभे राहतात. हें सगळें अनपेक्षित असल्यामुळे त्यांच्या मदतनीसांना अत्यंत आश्चर्य वाटतें. शेवटीं डॉक्टर सुधीर तें ऑपरेशन यशस्वी रीतीने पार पाडतात—पण कसल्या तरी स्मृतींनी त्यांचें मन विचलित झालेलें असतें आणि 'जीवनगंगे'तील स्वतःच्या खोलींत इझिचेअरवर पाइप ओढीत ते पडले असतांना त्यांच्या मनामध्ये विविध भावनांचा कल्लोळ सुरू होतो. नानातऱ्हेच्या स्मृति त्यांच्या डोळ्यांसमोरून तरळूं लागतात.

इथें 'जीवनगंगे'चा पहिला भाग संपतो. नंतरच्या चार भागांत डॉक्टर सुधीरच्या जीवनाचें दर्शन लेखकाने घडविलें आहे—त्यांचे सुरवातीचे हालाचे दिवस—शिष्यवृत्त्या मिळवून त्यांनी पूर्ण केलेलें शिक्षण—त्यांची कठोर ध्येयनिष्ठा व त्यांच्या ध्येयनिष्ठेला आलेलें जीवनगंगेचें फळ इत्यादि सर्व घटना विलोभ पद्धतीने वर्णन करून लेखकाने नंतर त्यांच्या जीवनांत प्रेम कसें शिरलें याचें वर्णन केलें आहे. डॉक्टरीण म्हणून प्रेमाचा 'जीनवगंगे'त प्रवेश झाला व कालान्तराने डॉक्टर सुधीरांचे एरवी ध्येयासक्त व प्रेमापासून विन्मुख असलेलें मन तिने जिंकून त्यांच्याशी विवाह केला. 'प्रेमाची मखमली पेटी' या भागांत प्रेमाने डायरींत लिहून ठेवलेला तिच्या विवाहपूर्व व वैवाहिक जीवनावर प्रकाश पाडणारा भाग आला.आहे. त्यांत प्रेमाच्या कोमल भावनांचा आविष्कार अतिशय रम्य रीतीने दाखविला आहे. सुधीरावरील तिचें प्रेम—वैवाहिक जीवनांतील सुरवातीचा सुखद व रम्य काल—नंतर जीवनांत वाटूं लागलेला ठराविक तोचतोपणा—मंजूचें त्यांच्या जीवनांत पदार्पण व सुधीराविषयीं रुजूं लागलेला संशय या साऱ्या प्रसंगाच्या वर्णनांत सूक्ष्म मनोविकारांचे धागेदोरे लेखकाने मोठ्या कुशलतेने उलगडून दाखविले आहेत. नंतरच्या भागांत प्रेमाचा मृत्यु व लीनाला शिक्षणासाठीं कलकत्त्याला बोर्डिंगमध्ये ठेवणें, या घटना क्षाल्या आहेत. येथपर्यंत विलोम पद्धतीने डॉ. सुधीरच्या आयुष्यांतील पूर्वभागाचें अवलोकन झाल्यावर 'गंगाकांठची हिरवळ' या प्रकरणांत लीनाचें आगमन, सुभाष व लीनीच्या विवाहाला डॉक्टरांची संमति या घटना झाल्यावर पुन्हा डॉ. सुधीरना 'जीवनगंगे'शी एकरूप केलें आहे.

कादंबरीचें कथानक हें असें आहे. कादंबरींत डॉ. सुधीर हेच प्रमुख असल्याने त्यांचें स्वभाव-चित्र अत्यंत उठावदार व रम्य असें झालें आहे, पण त्याबरोबरच इतर स्वभावचित्रें हीं बरींचशीं त्यांच्या स्वभावचित्राला उठाव देण्यासाठीं पार्श्वभूमी म्हणूनच निर्माण केलीं असावींत असें वाटतें. प्रेमाच्या स्वभावाविलणाला अधिक वाव 'मखमली' पेटी या प्रकरणांतच मिळाला आहे. पण एरवी तिचें स्वभावचित्र अस्पष्ट व कांहींसें अवास्तव वाटतें. एवढी कुशल डॉक्टरीण असून ती डॉ. सुधीरशी लग्न झाल्यानंतर एकादांहि डॉ. सुधीरच्या 'जीवनगंगे'त काम करावयास जात नाहीं, याचें जसें आश्चर्य वाटते. तसेंच गणूचा व मंजूचा एकमेकांशीं अधिकाधिक येणारा संबंध तिला दिसूं नये व सुधीरचा एखादा अज्ञ बाईप्रमाणें तिने मंजूसंबंधीं संशय घ्यावा हेंहि तितकेंच चमत्कारिक वाटतें. विवाहपूर्व ध्येयांचा तर तिला पूर्ण विसरच पडलेला दिसतो. तिच्याप्रमाणेंच 'लीना'चें स्वभावचित्रणहि फार अंधुक झाल्यासारखें वाटतें. डॉक्टरांनी लीनाला कलकत्त्यासारख्या दूर शहरीं नीलादेवीकडे वर्षानुवर्षे ठेवावी हेंहि जरा अवास्तव वाटतें. तिने चळवळींत घेतलेला भाग—तिचें भूमिगत होऊन कार्य करणें—इत्यादि गोष्टी जरी तिची राष्ट्रीय वृत्ति व्यक्त

अनुक्रमणिका

करीत असल्या तरी त्यांना फार दुय्यम महत्त्व कथानकांत दिलें गेलें आहे. त्यामुळे तिचें स्वभावचित्रसुद्धां अस्पष्टच वाटतें.

कथानकाची रचना नाविन्यपूर्ण रीतीने करण्याचा प्रयत्न केला असला तरी कथानकांत प्रभावी समर-प्रसंग फारसे नसल्यामुळे एकंदर कथानक कंटाळवाणें वाटतें. पुन्हा पुन्हा त्याच त्याच गोष्टींची पुनरावृत्ति फार वेळां झाली आहे. विलोम पद्धतीने कथानक सांगण्यांत मनाची पकड घेणाऱ्या घटना कथानकांत यावयास पाहिजेत. तशाहि कुठे येत नाहीत. डॉ.सुधीर व प्रेमा यांच्या जीवनप्रवाहांतसुद्धां असे खटके दिसून येत नाहीत. मंजूबद्दल डॉ. सुधीरांचा प्रेमाला आलेला संशय ही एकच घटना नाटयपूर्ण आहे पण ती अवास्तव वाटते. हॉस्पिटलचें व ऑपरेशनचें एकंदर वर्णन लेखकाच्या निरीक्षण शक्तीची साक्ष देत असलें तरी कथानकांत वाचकांचें कुतूहल उत्कटपणें वाढविण्यास त्यांची कांहीच मदत झाली नाही. उत्कट अमर प्रसंगाच्या अभावीं कथानकांत गति कुठेंच येत नाही. आणि त्यामुळे कथानक रेंगाळत आहे असें पुष्कळ वेळां वाटूं लागतें.

'मनोविश्लेपणात्मक सामाजिक कादंबरी' असें या कादंबरीचें वर्णन केलें आहे. यांत आलेलें मनोविश्लेपण अगदीं सामान्य स्वरूपाचें आहे. डॉ. सुधीरच्या मानसिक कल्लोळांचें केलेलें विवेचन पुष्कळ वेळां सुसंगत वाटत नाही. आणि प्रेमाच्या मनोविश्लेपणाच्या बाबतींत तर कांही पुष्कळ वेळां अवास्तवता दिसून येते सामाजिक कादंबरी असें या कादंबरीला म्हणतां येईल. पण समाजांतलि एकादा ज्वलंत प्रश्न यांत घेतला आहे असेंहि कादंबरी वाचून वाटत नाही. तसेंच म्हटलें तर राजकारणाचें ठिगळ शेवटीं जोडल्यामुळे 'राजकीय पार्श्वभूमीवर आधारलेली कादंबरी' असेंहि हिला कुणीं संबोधलें तरी कोण काय आक्षेप घेणार?

रघुवीर सामंतांची भाषाशैली मात्र त्यांच्या आतांपर्यंतच्या साहित्याला साजेशी आहे. पण रघुवीर सामंतांकडून कादंबरीसंबंधीं ज्या अपेक्षा आम्ही करतों, त्या मात्र या कादंबरीने पूर्ण झाल्या नाहीत असें म्हटल्यावाचून राहवत नाही.

—प्रा. म. ना. अदवंत.

**हिंदसंसार** (गद्य नाटक)— (लें० श्री. नी. वि. गद्रे; किंमत २ रुपये. पृष्ठें ८०).

'कृष्ण कारस्थान' हें (कंसवधप्रसंगाचें) संगीत नाटक श्री. गद्रे यांनी १९३६ सालीं लिहिलें. त्यानंतर आज अकरा वर्षांनी त्यांचें हें 'हिंदसंसार' सामाजिक गद्य नाटक प्रसिद्ध होत आहे.

इंग्रजी शिक्षणाने आमचा कसा तोटा झाला आहे व आमच्या कुटुंबव्यवस्थेची कशी हानि झाली आहे, हें नाटककाराला मुख्यतः दाखवावयाचें आहे. विश्वेश्वर पंडित, पिलुभट व गदाधरशास्त्री हा एक जुन्यांचा अभिमानी असा गट आहे. त्यांना कोणत्याहि विश्वविद्यालयाच्या पदव्या नाहीत. तरी पण विश्वेश्वर ह्याने वैद्यकशास्त्रासह बऱ्याच शास्त्रांचा अभ्यास केला असून, तो बहुश्रुत, सात्त्विक व परोपकारी दाखवला आहे. पिलुभट भिक्षुक असून मॅट्रिक झालेल्या मुलीशीच विवाह करावयाचा असा त्याचा निश्चय आहे. याच्या उलट आंग्लविद्याविभूषित सुशिक्षितांचा एक गट आहे. रावसाहेब व उमाकाकू या दांपत्याची एकुलती एण मुलगी शकुंतला एम्. ए. असून सुंदर आहे. तिची मैत्रिण कोकिळा बी. ए. असून स्वरूपानेहि कोकिळेसारखीच आहे. शकुंतलेचा पहिला

प्रियकर वसंतराव एल्‌ एल्‌. बी. चा अभ्यास करतो आहे, तर त्याची बहीण अलका बी. ए. आहे. वसंतरावाने पर्वतीकरांची सुशिक्षित कन्या इंदिरा हिला आधीच नादीं लावलें असून ती गर्भावस्थेच्या संकटांत सांपडलेली असते व म्हणून वसंतराव शकुंतलेबरोबर लग्न करण्यास प्रथम नकार देतो. इंदिरा आत्महत्या करते व म्हणून मोकळा झालेला वसंतराव शकुंतलेला पुन्हां लग्नाची मागणी घालतो. परंतु मध्यंतरी त्याचें सर्व कपट कोकिळेकडून (वसंतरावाने इंदिरेला लिहिलेल्या पत्रान्वये) शकुंतलेला कळतें. तसेच शकुंतलेला औषधपाणी देऊन विश्वेश्वर पंडित आजारांतून बरी करतो. वसंतरावाची बहीण अलका एका परधर्मीयाच्या प्रेमपाशांत सापडून गर्भावस्थेच्या संकटांत पडते. शेवटीं कपटी, चोर व खुनी अशा वसंतरावास पोलिसांच्या ताब्यां देण्यांत येतें. शकुंतलेचा विश्वेश्वर पंडिताशी व कोकिळेचा पिलुभटाशी विवाह होतो.

विश्वेश्वर, पिलुभट, गदाधरशास्त्री यांना जरी इंग्रजी येत नसलें तरी त्यांची संस्कृति उच्च दर्जाची असून, इंग्रजी शिक्षणामुळे वसंतराव, अलका, इंदिरा वगैरे कशी बिघडली व त्यामुळे त्यांची कशी वाताहात झाली हें नाटककारास स्पष्ट करावयाचें आहे. बी. ए. झालेल्या परंतु कुरूप असलेल्या मुलीचें लग्न होणें कसें अवघड जातें हें कोकिळा या पात्रान्वये लेखकानें मांडलें असून सुशिक्षित पदवीधर मुलीने आपल्यापेक्षा जास्त पदव्या असलेल्या पुरुषाशीच विवाह करण्याचा हट्ट न धरतां इंग्रजी येत नसलें तरी वृत्तीने, शरीराने सुदृढ असलेल्याशी लग्न करावें असें विश्वेश्वर–शकुंतला यांच्या विवाहाने दाखवून दिलें आहे.

" शाळा–कॉलेजें म्हणजे चोरट्या प्रेमाच्या पतपेढ्या" (पृष्ठ ३६), "शृंगाराची लूटमार करून जीवनाचा फुलबाग बनवण्याचं ठिकाण म्हणजे कॉलेज" (पृष्ठ ३६), "सहशिक्षणाची सोय बंद होऊं द्या–कॉलेजांतली अर्धी गर्दी कमी झालीच समजा" (पृष्ठ ३७) "प्रचलित शिक्षणपद्धतीमुळे ज्ञानदृष्टि नष्ट झाल्याचा हा उत्कृष्ट पुरावा" (पृष्ठ ४०), "स्वातंत्र्यमंदिराकडे नेणारी कोणती राष्ट्रीय प्रगति झाली तें सांगा" (पृष्ठ ४१) इत्यादि शेरे सद्यःकालीन कॉलेजांतील व विश्वविद्यालयीन शिक्षणपद्धतीवर लेखकाने मारले असून शिक्षणाने आम्हास समर्थ, स्वावलंबी व राष्ट्रहितैषी बनविलें पाहिजे असा आदेश लेखकाने दिला आहे.

• शिक्षणपद्धतींतील वाईट गोष्टींसंबंधी नाटककाराचा उद्वेग ठीक आहे, परंतु सर्वच शिक्षण वाईट व कुचकामाचें आहे असा त्याचा अर्थ करणें योग्य होणार नाही. कांही बाबतींत शिक्षणपद्धतीचें बाह्य स्वरूप जरी त्याज्य असलें तरी याच पद्धतींत तयार झालेलीं कोकिळा, शकुंतला अशीं चांगलीं माणसें आहेतच ना ? वसंतराव, अलका अशासारखीं माणसें अगदी उत्तम ठरलेल्या शिक्षणपद्धतींत सापडणारच नाहीत का ? तेव्हां शिक्षण हें जें पुढील आयुष्याचा पाया भक्कम करण्याचें साधन तें वापरणारावर अवलंबून आहे. काड्याच्या पेटीचा उपयोग जर कोणी घरें जाळण्याकरतां करूं लागला तर तो दोष कोणाचा ? काडीचा की वापरणाराचा ? इंग्रजी शिक्षणपद्धति सदोष आहे, परंतु तिने आम्हाला सर्व जगासंबंधी विचार करावयास शिकविलें हें विसरून चालणार नाही, नाही तर आम्ही पूर्वीचेच कूपमंडूक राहून नुसत्या यज्ञयागादि कर्मांतच दंग राहिलों असतों. नाटककाराने ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्यांपैकी वाईट गोष्टी टाकून, शिक्षणाने मनुष्य समर्थ, स्वावलंबी व राष्ट्रहितैषी झाला पाहिजे हें कोणीहि कबूल करील.

श्री. गद्रे हे पदवीधर नाहीत किंवा पाश्चात्य वाङ्मयाशी त्यांचा मोठा परिचय आहे असेंहि दिसत नाही. तरी सुद्धा त्यांच्या नाटकांत सुटसुटीत संवाद, ओघवती भाषा, स्वाभाविक विनोद, नाट्यरचनेचें कौशल्य, अभिनयाला अवसर, संयम, सदभिरुचि वगैरे गुणांचा प्रत्यय येतो.

—डॉ. ज. का. घारपुरे.

**बंद पडलेलं घड्याळ**—(ले० व. र. पंडित. गुजरी, कोल्हापूर. मूल्य १॥ रु.)

जीवनांतले साधे सुधे प्रसंग घेऊन ते शक्य तितक्या चटकदारपणें मांडण्याचा प्रयत्न या लघुकथा-संग्रहांत केलेला आहे. लेखकाने आपली भूमिका प्रामाणिकपणाने मांडली असल्यामुळे वाचकाचा अपेक्षाभंग होत नाही. परिवर्तन ही कथा मात्र अगदीं सामान्य आहे. भावनेचें चित्रण करतांना एकदम हळवेपणा ( Sentimentality ) दाखविणें हा दोष कांही कथांतून दिसतो. प्रसंगनिष्ठ विनोदावर आधारलेल्या कथा मात्र बऱ्या आहेत.

**मराठी नाट्यकथा**—(ले० वि. द. साठे. मंगल साहित्य प्रकाशन. मूल्य ३ रु.)

इतर प्रांतीय भाषांशी तुलना केली असतां मराठींतील नाट्यवाङ्मय हें चांगलेंच समृद्ध व अव्वल दर्जाचें आहे. आज जरी मराठी रंगभूमिला पडता काळ आला असला तरी तिचें गतवैभव अत्यंत उज्ज्वल आहे. आजच्या विद्यार्थीवर्गाला मराठी नाट्यवाङ्मयाची ओळख करून देण्याकरितां प्रस्तुत पुस्तक लिहिलेलें आहे. सौभद्र, शारदा, तोतयाचें बंड, एकच प्याला, साष्टांग नमस्कार इत्यादि अकरा उत्कृष्ट नाटकांच्या कथा यांत समाविष्ट केल्या आहेत. या कथा लिहिण्याची पद्धति अतिशय चित्तवेधक आहे. श्री. साठे यांची शैली नाट्यपूर्ण आहे. आणि शिवाय मूळ नाटकांतील वेधक संवाद तसेच ठेवण्यांत त्यांनी मोठें औचित्य दाखविलें आहे. शारदा, सत्तेचे गुलाम व स्थानिक स्वराज्य या नाटकांच्या कथा विशेष सरस उतरल्या आहेत. त्यामानाने सौभद्र नाटकाची कथा कांहीशी अपुरी वाटते.

या कथांची संपादणी करतांना लेखकाने एक दृष्टिकोन ठेवलेला आहे. नाट्यवाङ्मयाचा विकास, तंत्रांत होत जाणारा बदल याचबरोबर प्रेक्षकांच्या अभिरुचींतील बदल व महाराष्ट्राच्या समाज-जीवनांतील स्थित्यंतरें यांचीही सूचकतेने माहिती दिली आहे. संवाद, विनोद, संगीत, रंगभूमीची सजावट यांत होत जाणारी उत्क्रांति दाखविणारीं परिशिष्टें जोडण्यांतहि श्री. साठे यांनी मार्मिकता दाखविली आहे. नाट्यवाङ्मयाबद्दल विद्यार्थी वर्गाचें कुतूहल जागृत करण्यास हें अभिनव पुस्तक खास समर्थ आहे.

—प्रा. ग. प्र. प्रधान.

---

# परिषद्वार्ता

( चिटणिसांकडून )

**विनंती**— नवीन वर्षाची तिमाही संपली आहे. ज्यांनी अद्याप १९४८-४९ ची वर्गणी पाठविली नाही त्या सभासदांनी आपली वार्षिक वर्गणी रु. ३म. ऑ. ने अगर अन्य रीतीने कार्यालयाकडे सत्वर पाठवावी. मागील वर्षाची बाकी असल्यास तीहि कृपा करून पाठवावी. घ. नि. ९ ( अ ) प्रमाणे बाकी असणाऱ्या कोणाहि सभासदास येत्या वर्षी होणाऱ्या निवडणुकीत मत देतां येणार नाही.

**भेटः**— श्रीमंत राजे भवानराव उर्फ बाळासाहेब पंतप्रतिनिधि, औंध यांनी दि. १ एप्रिल १९४८ रोजीं परिषदेस भेट दिली. परिषदेने हातीं घेतलेल्या इमारत योजनेची त्यांना माहिती करून देण्यांत आली व त्यांचा सत्कार करण्यांत आला.

**दुखवटासभा**— परिषदेचे माजी कार्याध्यक्ष व 'ज्ञानप्रकाश'चे माजी संपादक कै. कृ. ग. ऊर्फ काकासाहेब लिमये आणि सांगली येथे भरलेल्या साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष कै.गो. गो. मुजुमदार उर्फ कवि साधुदास यांच्या निधनानिमित्त रविवार दि. २ मे १९४८ रोजीं मा. प. साहित्य मंदिरात प्रा. न. र. फाटक यांच्या अध्यक्षतेखाली दुखवटासमा भरली होती. सभेत राजकवि यशवन्त, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. गोपीनाथ तळवलकर प्रा. गं. भा. निरंतर, श्री. म. दा. साठे, श्री. वि. द्यों. कुलकर्णी, राजरत्न वा. वि. जोशी इत्यादींचीं शोक व्यक्त करणारीं भाषणें झालीं.

**प्रकाशन समारंभः**— कै. ज्योतिर्विद शंकर बाळकृष्ण दीक्षित यांच्या 'ज्योतिर्विलास अथवा रात्रीची दोन घटका मौज' या ग्रंथाच्या सुधारून वाढवलेल्या आवृत्तीचा प्रकाशन समारंभ बुधवार दि. ५ मे १९४८ रोजीं परिषदेच्यावतीने मा. प. साहित्य मंदिरांत महर्षि अण्णासाहेब कर्वे यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. डॉ. परांजपे व प्रा. मो. ल. चंद्रात्रेय यांनी ग्रंथवर्णनपर भाषणें केलीं.

**महर्षि कर्वे व डॉ. र. पु. परांजपे सत्कारः**— परिषदेचे सभासद महर्षि डॉ. अण्णासाहेब कर्वे यांचा त्यांच्या ९१ व्या वाढदिवसानिमित्त व डॉ. र. पु. परांजपे यांचा त्यांच्या ऑस्ट्रेलियांतील यशस्वी कामगिरीबद्दल दि. ५ मे १९४८ रोजीं प्रा. न. र. फाटक यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार करण्यांत आला. अध्यक्षांनी डॉ. कर्वे व डॉ. परांजपे यांच्या संबंधी निरनिराळ्या मनोरंजक आठवणी सांगून गुणवर्णनपर भाषण केलें. समारंभास पुणें विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. जयकर, परिषदेचे कार्यकर्ते, व अितर अनेक साहित्यिक व साहित्यप्रेमी उपस्थित होते. परिषदेचे चिटणीस प्रा. वा. दा. गोखले यांनी आभार मानल्यावर समारंभ संपला.

**विद्वद्रत्न डॉ. दप्तरी यांची व्याख्यानें व सत्कार**— शनिवार दि. ५ जून व रविवार दि. ६ जून १९४८ रोजीं विद्वद्रत्न डॉ. के. ल. दप्तरी यांचीं 'उपनिषदांचा बुद्धिप्रत्यायिक व वस्तुनिष्ठ अर्थ' या विषयावर प्रा. न. र. फाटक यांचे अध्यक्षतेखाली व्याख्यानें झालीं. व्याख्यान-समाप्तीनंतर डॉ. दप्तरींचा परिषदेतर्फे व इतर दहा बारा संस्थांतर्फे सत्कार करण्यांत आला. सत्कारप्रसंगीं श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य भागवत व प्रा. न. र. फाटक यांनी भाषणें केलीं. डॉ. दप्तरींचे आभारप्रदर्शक भाषण झाल्यावर समारंभ संपला.

**कार्यकारी मंडळ–** कार्यकारी मंडळाच्या दोन सभा सोमवार दि. १२।४।४८ व व ३०।५।४८ रोजीं होऊन इमारत व चालू वर्षीचें व्याख्यानसत्र यासंबंधी योजना ठरविण्यांत आल्या.

**नियामक मंडळ–** नियामक मंडळाची पहिली सभा दि. ४।४।४८ रोजीं परिषदेचे अध्यक्ष प्रा. न. र. फाटक यांच्या अध्यक्षतेखाली भरली. परिषदेचें वार्षिक इतिवृत्त, जमाखर्च व पुढील वर्षीचें अंदाजपत्रक संमत करण्यांत आलें. तूट भरून काढण्यासंबंधी विचार होऊन १९४९-५० चे अंदाजपत्रक तोंडमिळवणीचें मांडावें अशा अर्थाचा ठराव झाला. संमेलनाचें निमंत्रण मागें घेतल्याबद्दलचें मुंबई मराठी साहित्य संघाकडून आलेलें पत्र वाचून दाखविण्यांत आलें व याबाबतींत कार्यकारी मंडळाने 'एकंदर परिस्थितीमुळे या वर्षीचें संमेलनाचें अधिवेशन स्थगित करावें' अशी जी शिफारस केली त्या शिफारशीस सभेने मान्यता दिली. संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी मागविलेल्या मतपत्रिका रद्द कराव्यात असें ठरलें. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर स्मारक मंदिराची योजना व इमारतीचा नकाशा सभेने संमत करून इमारतीच्या संबंधी सर्व व्यवस्था करण्याचा कार्यकारी मंडळास अधिकार देण्यांत आला. पुणें विद्यापीठ स्थापना करण्यांत जी तत्परता दाखविण्यांत आली त्याबद्दल मुंबई सरकारचे अभिनंदन करण्यात आले. मुंबई सरकारच्या सुरक्षा कायद्यांतील कांहीं दुरुस्त्या व पुरस्त्या वाङ्मयविकासाला बाधक असल्यामुळे त्यासंबंधी सभेने तीव्र नापसंतीचा ठराव केला व त्या कायद्यांतील एतद्विषयक कलमें रद्द करण्याची सभेने आग्रहाची मागणी केली. संमेलन स्थगित झाल्यामुळे वार्षिक सभा भरविण्याबद्दल उद्भवलेल्या प्रश्नाचा विचार करण्यासाठी नियामक मंडळाची विशेष सभा बोलविण्याचे ठरलें व त्याप्रमाणे ही सभा रविवार दि.२ मे १९४८ रोजीं भरली.

**वार्षिक सभा–** परिषदेची वार्षिक सभा रविवार दि. ६ जून १९४८ रोजीं भरली होती. सुरवातीस कै. महात्मा गांधी, कै. तात्यासाहेब केळकर, कविवर्य बी, कै. काकासाहेब लिमये व कै. कवि साधुदास यांच्या निधनानिमित्त शोक व्यक्त करणारे स्वतंत्र ठराव संमत करण्यांत आले. तसेंच पुढील साहित्यिक व साहित्यप्रेमी गृहस्थांबद्दल दुखवटा-ठराव करण्यांत आले. कै. ल. ना. जोशी, कै. प्रि. वि. के. भागवत, कै. राजेसाहेब अप्पासाहेब पटवर्धन जमखिंडी, कै. प्रा. ग. ह. केळकर, कै. अं. गो. पुणतांबेकर, कै. ना. वि. कुलकर्णी, कै. अ. बा. गजेंद्रगडकर, कै. वि. ल. बर्वे, कै. श्री. काशीबाई कानिटकर, कै. बाबूराव साळवेकर, कै. प्रा. श्री ना. कोल्हटकर, कै. पां. गो. रानडे, कै. सौ. वत्सलाबाई घाटे. इतिवृत्त, जमाखर्च व अंदाजपत्रक सभेने संमत केलें. १९४८-४९ साठी जी. एम. ओक आणि कं. स हिशेब तपासनीस नेमण्याबद्दलची चिटणीसांची सूचना संमत झाली. नियामक मंडळाने सुरक्षा कायद्यासंबंधी केलेला ठराव वार्षिक सभेत मांडण्यासंबंधी प्रा. अ. रा. कामत यांनी सूचना केली. श्री. ह. श्री. शेणोलीकर यांनी सूचनेस अनुमोदन दिलें व तो ठराव वार्षिक सभेने संमत केला. सभेनंतर चहापानाचा कार्यक्रम झाला.

**चुकीची दुरुस्ती–** पत्रिकेच्या गेल्या अंकात छापलेल्या इतिवृत्तांत 'स्वाध्याय मंडळ' या सदरात डॉ. बा. मो. कानिटकर यांचें नांव घालायचें अनवधानतेने राहून गेलें. या चुकीबद्दल चिटणीसांनी वार्षिक सभेंत दिलगिरी व्यक्त केली आहे व डॉ. कानिटकरांची क्षमाहि मागितली आहे.

# साभार स्वीकार

१ गोल देऊळ ( कादंबरी )—ले. स. ना. सूर्यवंशी; प्रका. नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर; मूल्य तीन रु.

२ सुरेख संगम ( कादंबरी )—ले. पां. गो. लोहोकरे; प्रका. राका प्रकाशन, पुणें २; मूल्य तीन रु.

३ नाटिका आणि इतर नाटकें—ले. वा. बा. केळकर; संपा. व प्रका.—डॉ. य. गं. लेले, पुणें ४; मूल्य आठ रु.

४ कृष्णरजनी ( कादंबरी ) आणि

५ उद्याची कन्या ( निबंधसंग्रह ) —सौ. मालतीबाई दांडेकर; महाराष्ट्र ग्रंथभांडार; कोल्हापूर; मूल्य पांच व तीन रु.

६ मुजऱ्याचे मानकरी—ले० य. गो. पुरंदरे; प्रका. य. गो. जोशी, पुणें २; मूल्य सव्वा दोन रुपये.

७ सुमित्रानंद पंत—( कवि परिचय व काव्यचर्चा ) आणि

८ संयुक्त महाराष्ट्र—ले. दि. के. बेडेकर; प्रका. चित्रशाळा प्रकाशन, पुणें. मूल्य अनुक्रमें बारा आणे व पांच रु.

९ महर्षि अण्णा कर्वे—ले. भा. आ. वीरकर; प्रका. के. भि. ढवळे, मुंबई ४; मूल्य आठ आणे.

१० तत्त्वार्थ–सूत्र ( जैन संप्रदाय—विषयक ग्रंथ )—ले० पं. कैलासचंद्रजी सिद्धांतशास्त्री; अनु ब्र.जीवराज दोशी; प्रका. जैन बुकडेपो, सोलापूर; मूल्य बारा आणे.

११ जैनधर्म आणि वाङ्मय—ले० डॉ. प. ल. वैद्य; प्रका. नागपूर विद्यापीठ; मूल्य दीड रु.

१२ श्रीगुरुचरित्रसारामृत—ले० वि. रा. बरवे; प्रका. एन. के. पब्लिशिंग हाऊस, पुणें २; मूल्य साडेतीन रु.

१३ काव्यविहार—ले. कै. डॉ. मा. त्र्यं. पटवर्धन; प्रका. मनोहर ग्रंथमाला, टिळक रस्ता पुणें २; मूल्य चार रु.

१४ टीका आणि टीकाकार—डॉ. वा. भा. पाठक, प्रका. नॅशनल इन्फर्मेशन अँड पब्लिशर्स लि. मुंबई; मूल्य बारा रु.

१५ शास्त्री दप्तरांतील वेंचें— प्रका० स्टेट रेकॉर्ड डिपार्टमेंट, बडोदें; मूल्य तीन रु. पांच आणे.

१६ उघड्या जगांत ( कादंबरी )—ले० म. भा. भोसले; प्रका. ग्रामीण प्रकाशन संस्था, भिलवडी, जि. सातारा; मूल्य चार रु.

१७ संयुक्त महाराष्ट्राची माहिती–संयुक्त महाराष्ट्र प्रकाशन, पुणें ५. मूल्य तीन रु.

१८ पद्मपद्माकर ( कवितासंग्रह आवृत्ति दुसरी )—कै. अ. सी. साठे व कै. नी. ब. भवाळकर; प्रका. सुविचार प्रकाशन मंडळ, कॉंग्रेसनगर, नागपूर; मूल्य दोन रु.

१९ मीठभाकर ( कवितासंग्रह ) ग. ल. ठोकळ; प्रका. सौ. लीलाबाई सुखटणकर, सातारा; मूल्य अडीच रु.

२० मराठीचिये नगरी—ले. द. रा. कानेगांवकर; प्रका. बेळगांव बुकडेपो; मूल्य दीड रु.

२१ ' हरिवरदा ' मधील वेंचे ( श्रीमत् कृष्णादयार्णवकृत )—संग्राहक–कै. गो. कृ. देशपांडे; प्रका. द. र. कोपर्डेकर; मूल्य चार आणे.

२२ साहित्याची कामगिरी—ले. द. बा. कालेलकर; प्रका. नवजीवन प्रकाशन मंदिर, अहमदाबाद; मूल्य एक रु.

२३ तुलादानविधि—ले. ग. ह. खरे, प्रका. देशमुख आणि कंपनी, पुणें २; मूल्य आठ आणे.

२४ मीलन ( कादंबरी )—ले. पां गो. लोहोकरे; प्रका. सदभिरुची प्रकाशन, पुणें २, मूल्य साडे तीन रु.

25 Location of Lanka-Saradar M. V, Kibe; Published by Manohar Granthamala, Tilak Rd. Poona 2; Price Rs, 2.

२६ मंजरी ( कवितासंग्रह )—कृष्णाताई वैशंपायन, बी. ए. प्रका.—आर्यसंस्कृति मुद्रणालय, पुणें. मूल्य दोन रु.

अनुक्रमणिका



मुद्रक— लक्ष्मण नारायण चापेकर, 'आर्यसंस्कृति मुद्रणालय,' १९८/१७ सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणें २.

प्रकाशकः— रामचंद्र श्रीपाद जोग, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.



अनुक्रमणिका